कादंबरीमय आंग्लशाही : ४

# भारतमाता वनवासी


लेखक

विठ्ठल वामन हडप





प्रकाशन क्रमांक ५४

मुख्य विक्रेते

बॉम्बे बुक डेपो

गिरगांव, मुंबअी ४.

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

मूल्य तीन रुपये

विठ्ठल वामन हडप लिखित

## कादंबरीमय आंग्लशाही

१ भारतमाते ऊठ

२ भारतमातेची हांक

३ भारतमातेचा शाप

४ भारतमाता वनवासी

५ भारतमातेचें दिव्य

६ भारतमाता की जय



प्रकाशक : ग. पां. परचुरे,
ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, गोरेगांवकर चाळ क्र. २, गिरगांव, मुंबअी ४
मुद्रक : मा. कृ. सहस्रबुद्धे, श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

# प्रभाकर पिक्चर्सचा

१९५१ चा कार्यक्रम

---

## सूर्य जयद्रथ

( पौराणिक हिंदी )

आणि नंतर 'प्रभाकर'चें मानचित्र

## शककर्ता शिवाजी

## (SHIVAJI THE GREAT)

[ हिंदी, मराठी व तामीळ भाषांत ]

---

श्री गौरी पिक्चर्स, कोल्हापूर

सादर करीत आहे

## शिवा रामोशी

[ मर्द चित्र–मराठी भाषेंत ]

प्रभाकर स्टूडिओंत तयार होत आहे.

# भारतमाता वनवासी

## दुसऱ्या महायुद्धाच्या ज्वाला

"महायुद्धाचा वणवा अधिकाधिक भडकत आहे. आज भारताचा महासागर खवळला आहे. देशभर भयंकर वादळ उठलें आहे. आपली भारतमातेची नौका त्या वादळांत सांपडली आहे. तिला आज धड सोडलेला किनारा दिसत नाहीं व धड पैलतीर दिसत नाहीं. अशा परिस्थितींतूनही आपणाला ही नौका सुखरूप पैलतीराला न्यायची आहे..."

त्या दिवशीं सायंकाळीं सहा वाजण्याच्या सुमाराला मुंबईच्या कामगार मैदानावरील हजार लोकांच्या त्या खळबळीच्या सभेंत एक वक्ता आवेशानें हातवारे करून बोलत होता.

"...ही नौका सुखरूप किनाऱ्याकडे नेण्याचा आज एकच मार्ग आपणापुढें मोकळा आहे..." वक्ता पुढें बोलूं लागला.

"तो कोणता ?" सभेंतून एकानें सवाल केला.

वक्ता त्या पृच्छकाला हातानें जरा सबूर करायला खुणावीत पुढें म्हणाला, "आज आपणासमोर म्हणजे एकट्या भारतमातेसमोर नव्हे, तर साऱ्या जगासमोर एकच महान् संकट आपला राक्षसी जबडा पसरून उभें आहे. तें संकट कोणतें तें तुम्ही ओळखतां..."

तोंच मध्यें विसंवादी सूर सभेंतून निघाला, "तें संकट कोणतें ?"

तेवढ्यांत दुसऱ्या एकानें मध्येंच उद्गार काढले, "तें संकट आपल्या-समोर उभें आहे तें. उभें राहून बोलतें आहे तें तें संकट."

त्या विधानानें तेवढ्या टापूंत बरीच खळबळ माजली. कांहींना तें त्या कोणा प्रेक्षकाचें विधान पटलें, तर कांहींना पटलें नाहीं. कांहीं त्याच्याकडे तटस्थ वृत्तीनें पाहूं लागले, तर कांहीं स्मित वदनानें, तर कांहीं संतापून पाहूं लागले.

ज्यांना ते उद्गार काढणारी व्यक्ति दिसली नाहीं, तेही जिकडून तो आवाज आला तिकडे आपापल्या भावनांचा चर्येवर आविष्कार करीत पाहूं लागले.

कांहींनीं हुश् हुश् करून सर्वांना शांत राहण्याला सुचविलें. त्यामुळें खळबळीची उसळूं लागलेली लाट जरा शमली.

वक्ता पुढें बोलूं लागला,

"भाई हो! असे उतावळे होऊं नका. भावनांच्या आहारीं जाऊं नका. तुमच्या अंतःकरणांत या वेळीं कोणती आग धडाडते आहे याची मला पूर्ण कल्पना आहे...."

तोंच सभेंतून पूर्वींचाच विसंवादी सूर निघाला, "आणि तुमच्या अंत:करणांत कोणती आग धडाडते आहे याची आम्हांलाही पूर्ण कल्पना आहे."

"शांत व्हा. शांत व्हा. भाई हो, शांत व्हा. कृपा करून भावनेच्या आहारीं जाऊं नका. मला पुरतें बोलूं द्या..." वक्ता आपला स्वर उंचावून दोन्ही हात जोडून उद्गारला.

इतका वेळ स्तब्ध असलेला सभाध्यक्ष सभेत जास्त गोंधळ माजण्याचीं चिन्हें दिसूं लागतांच उठून उभा राहिला व मोठ्यानें उद्गारला, "भाई हो! वक्त्याला काय सांगायचें तें पूर्णपणें सांगूं द्या. भाषणस्वातंत्र्यासाठीं आज आपण झगडत आहों ना! आजवरची आपली महायुद्धकालांतील सत्याग्रहाची चळवळ पूज्य महात्मा गांधींनीं आपणाला भाषणस्वातंत्र्याच्या मागणीवर उभारून दिली आहे. आपण सारे महात्मा गांधींना मानणारे व त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागणारे त्यांच्या सत्याग्रहसेनेंतील निष्ठावंत सैनिक आहां ना!..."

बोलतां बोलतां वक्त्याच्या मुद्रेकडे अध्यक्षांचें लक्ष गेलें. आपल्या प्रश्नाला नकारार्थी मान डोलविण्याच्या रंगांत वक्ता येणार ही आगाऊ कल्पना होती म्हणूनच कीं काय, अध्यक्षांनीं तिकडे पाहिलें; व पाहतां पाहतां सभेचें लक्ष मोठ्या चतुराईनें चुकवून वक्त्याच्या शर्टचा मागचा पदर धरून हळूच ओढीत हलक्या स्वरांत सूचना दिली, "शेख मिरा! समाज खवळला आहे. हें ध्यानीं घेऊन थोडक्यांत व मर्यादा सांभाळून बोला..."

आणि अध्यक्ष तसेच पुढें सभेला म्हणाले, "तुमची जर महात्मा गांधींच्या शिकवणीवर निष्ठा असेल, गांधीजींच्या सेनापतित्वाखालीं लवकरच सुरू होणाऱ्या भारताच्या महान् स्वातंत्र्ययुद्धांत भारतमातेच्या दास्य-विमोचनासाठीं लढणारे खरेखुरे स्वातंत्र्यसैनिक जर तुम्ही असाल, तर कोणाही वक्त्याच्या भाषणस्वातंत्र्यावर तुम्हीं कोणी असा घाला घालतां कामा नये."

अध्यक्षांच्या विनंतीचा सभेवर बराच अनुकूल परिणाम झाला.

"गप्प राहा रे. बोलूं द्या त्या कम्युनिस्टाला. लालजी सांगतो आहे, ऐका जरा." एकजण म्हणाला.

"काय ऐका? कशाला ऐका? शेख मिरा काय सांगणार त्याची कल्पना आहे आम्हांला..." दुसरा एकजण मध्येंच नापसंतीदर्शक बोलला.

"पण आम्हांला तो काय बोलतो तें ऐकायचें आहे. तुम्हांला नसेल ऐकायचें तर तुम्ही सभेंतून बाहेर जा कसे! सभेंत बखेडा काय म्हणून?" आणखी एकानें पूर्वीच्या दोघांनाही नापसंतीदर्शक स्वरांत दटावलें.

सभेंत पुन्हां हुश् हुश् सुरू झालें.

"ज्या कुणाला सभेंत बोलायचें असेल, त्यांना बोलायला संधि मिळेल. पण एक वक्ता बोलत असतांना त्याला अडथळा करणें आपणांसारख्या शिस्तीच्या सैनिकांना शोभत नाहीं." अशी सभेला पुन्हां एकवार सूचना देऊन अध्यक्ष लालजीनें शेख मिराला भाषण सुरू ठेवायला सुचविलें.

"भाई हो! मी तुम्हांला अनोळखी नाहीं व तुम्ही मला अनोळखी नाहीं..." वक्ता बोलूं लागला.

"होय होय! आम्ही तुम्हांला चांगले ओळखतों." मध्येंच एक

बारीकसा आवाज निघाला. पण त्याला सभेंतून फारसा प्रतिसाद मिळाला नाहीं.

वक्ताही बोलायचा थांबला नाहीं,

"आज आपल्या देशावरच काय, पण साऱ्या जगावर संकट कोसळलें आहे. त्या संकटाची जर आपणां सर्वांना योग्य कल्पना असेल, तर कोणी क्रिप्स आला काय व गेला काय, इंग्रजानें आपणाला दिलें काय आणि दिलें नाहीं काय, असला मारवाडी हिशेब करीत बसायला आपणाला सवड सांपडणार नाहीं..."

"हं! असे जातीवर घसरून आपल्या लोकयुद्धाचे टेंभे पाजळूं नका. भांडवलदार आणि कामगार यांच्यांत वितुष्टाचा विस्तव फुंकण्यासाठीं असे वाहत्या गंगेंत हात धुऊन घेऊं नका." एक गोरटेलासा खादीवेषधारी तरुण मारवाडी झटक्यासरसा आवेशानें उभा राहून हातवारे करीत उद्गारला.

"बरोबर आहे." एक आवाज निघाला.

वक्ता तिकडे लक्ष न देतां धिटाईनें पुढें बोलूं लागला,

"फासिझम आज साऱ्या जगाला ग्रासूं पाहणारा भस्मासुर माजला आहे. युरोपांत तर दोस्त राष्ट्रांचा विध्वंस करायला हिटलर–मुसोलिनी हे दोन भयंकर दैत्य आपला अक्राळविक्राळ जबडा पसरून उभे आहेतच..."

"पण त्या हिटलर–मुसोलिनींच्या मागें जाणारीं तुमच्याआमच्या-सारखीं माणसेंच आहेत." दुसरा एक आवाज सभेंतून उमटला. एक रुबाबदार तरुण कपाळावर तिरपी भगवी टोपी ठेवून गरजला.

"तीं माणसें नाहींत; माणसांसारखीं दिसणारीं जनावरें आहेत. माणुसकी जे कोळून प्याले आहेत, राष्ट्रवादाच्या थोतांडानें बेहोष झाले आहेत, धनकुबेर जमीनदार–भांडवलदारांच्या आर्थिक मदतीनें ज्यांना मिंधे बनविलें आहे आणि यामुळें ज्यांची माणुसकी नष्ट झाली आहे, अशा फासिस्ट लांडग्यांना माणसें कोण म्हणेल?..."

प्रकरण हातघाईवर येण्याचा समय अगदीं जवळ आला. सभेंतून एकी-कडे बहुधा स्वच्छ कपडे केलेले पांढरपेशांत मोडणारे बरेचसे तरुण कांहीं भगव्या टोप्या तर कांहीं पांढऱ्या टोप्या धारण केलेले आपल्या विरोधकाला

उजव्या मनगटाची मूठ वळून आव्हान देत उभे राहिले, तर त्यांच्या समोर थोड्या अंतरावर वक्त्याची बाजू शब्दांनीं नव्हे तर कृतीनें उचलून धरणारे वीस बावीस तरुण तशाच आवेशांत जणूं काय भगव्या आणि पांढऱ्या टोप्यांचें पांढरपेशी आव्हान पत्करायला पवित्रा मांडून उभे राहिले. त्यांच्या चर्यांवरून व एकंदर आविर्भावावरून ते कामगार दिसत होते. त्या कामगारांपैकीं बहुतेकांच्या मस्तकावर मळकट पण गांधीटोप्या होत्या.

" हे कम्युनिस्टांचे रेडगार्ड बरें का ! " सभास्थानीं असलेल्या जमावांतील एक त्रयस्थ ऊर्फ बघ्या वृत्तीचा सौम्य चर्येचा तरुण शेजारच्या कोणा परिचिताला म्हणाला.

अखेर वक्ता सर्व विरोधांना पुरून उरला. लोकांचें पाणी त्यानें जोखलें असो, कीं त्याचें पाणी लोकांनीं जोखलें असो, पण वक्त्याचें भाषण पुढेंपुढें बऱ्याच शांतपणें पार पडलें. वक्त्याला विरोध करण्यासाठीं आवेशानें चिडून पटापट उभे राहिलेले तरुण हातरुमालाची घडी खिशांत ठेवावी तसा आवेश आवरता घेऊन चिडखोर मुद्रा करून खालीं बसले. त्यामुळें त्याचें आव्हान स्वीकारण्यासाठीं दुसरीकडे उभे राहिलेले वक्त्याचे पक्षपाती कामगारही खालीं बसले.

वक्ता शेख मिरा मोठा नामांकित वक्ता नव्हता खरा. परंतु तो कामगारांच्या चळवळींतील एक धडाडीचा व निधड्या छातीचा कार्यकर्ता म्हणून ओळखला जात असे. तो कम्युनिस्ट आहे, हें न सांगतां कोणालाही कळण्याजोगें होतें. इतकें त्याचें कामगार चळवळींतील कार्य महशूर होतें. मुंबईच्या कामगारांवर त्याचें चांगलें वजन होतें. सर्वच कामगारांना कम्युनिझम कळत होता अथवा मान्य होता असा त्याचा अर्थ नव्हे. पण कामगारांसाठीं जीव तोडून झटतो आहे ना, तर मग तो आपला माणूस; या भावनेनें सारे कामगार त्याच्याकडे पाहात असत.

बऱ्याच–किंबहुना बहुतेक कामगारांना कॉंग्रेसची व गांधीजींची युद्धविरोधी भूमिका पटत असे अथवा प्रिय वाटत असे असें नव्हे. तरी देखील शेख मिराचें युद्धसहकाराचें त्याच्या कम्युनिस्ट दृष्टिकोनांतून मुद्देसूद व परिणामकारक पण इतरांच्या दृष्टिकोनांतून खारटतुरट व विषारी भाषण अखेरपावेतों सामान्यतः शांतपणें पार पडलें.

तेवढयांत एका तरुण गोरटेल्याशा स्त्रीनें डाव्या कडेवर आपल्या मुलाला सांवरीत उजव्या हातानें एक चिठी आणून अध्यक्षांच्या हातीं दिली.

अध्यक्ष लालजी ती चिठी वाचून क्षणभर विस्मयचकित झाले. त्यांनीं पुन्हां त्या चिठीवरील नांव वाचलें. पुन्हां वाचलें :

' शकुंतला जोशी. '

## २

त्यासरसे किती तरी विचारतरंग एकसमयावच्छेदेंकरून लालजीच्या अंतःकरणांत उसळूं लागले.

' शकुंतला जोशी ' हें नांव पुन्हां पुन्हां जिव्हाग्रावर घोळवीत तो आपलीं स्मृतिचित्रें न्याहाळूं लागला, ' शकुंतला जोशी. आमच्या माजी कॉंग्रेस मंत्रिमंडळातील उपगृहमंत्री जयंत जोशी यांची पत्नी शकुंतला जोशी, ती तर ही नव्हे ? छे ! पण ती शकुंतला इकडे कशाला येईल ? राजाच्या राणीसारखी राजप्रासादतुल्य बंगल्यांत ऐषआरामांत राहणारी ती. तिला इकडे यायचें काय कारण ? आणि हें असें एखाद्या भिकारणीसारखें मूल खांद्यावर घेऊन ? छे ! ती नव्हेच ही. '

असें मनात म्हणत लालजीनें एकवार अर्थपूर्ण शोधक दृष्टीनें समोरच्या त्या गोरटेल्या लेकुरवाळ्या मुलीकडे न्याहाळून पाहिलें, व ती चिठी तशीच जवळच पण खालीं बसलेल्या शेख मिरापाशीं दिली.

शेख मिराच्या मनांतही लालजीसारखाच गोंधळ उडाला. त्यानेंही आपल्या आठवणी चाळवीत ती चिठी परत लालजीपाशीं दिली, व त्या लेकुरवाळ्या स्त्रीकडे न्याहाळून पाहिलें.

" शकुंतला जोशी. " अध्यक्षांनीं नव्या वक्त्याचें नांव पुकारलें.

त्यासरसे सभास्थानींचे किती तरी डोळे सभास्थानावर व आजूबाजूला भिरभिरू लागले.

सर्वांना नवल वाटण्याजोगी ती बाब अशासाठीं, कीं मुंबईच्या कामगार जगांत ' शकुंतला जोशी ' हें नांव अगदीं अपरिचित होतें. तें सभास्थान

म्हणजे कामगार मैदान ही जागाही मुख्यतः कामगारांच्या सभांची, व आजच्या सभेला बहुसंख्य श्रोते कामगारच होते. अनेक कामगार संघांच्या वतीनें ती सभा आज मुद्दाम मुंबईच्या कामगार जनतेला देशांतील युद्ध-जन्य परिस्थितीची जाणीव करून देण्यासाठीं भरविण्यांत आली होती.

जशी ती चिठी वाचून लालजी व शेख मिरा यांचीं पूर्व स्मृतिचित्रें जागृत झालीं, तशींच सभेंतील आणखी अनेकांचींही जागृत झालीं.

विशेषतः अध्यक्षांच्या उजव्या बाजूला खुर्च्यांवर बसलेल्या स्त्रियांना तर तें नांव ऐकून विशेष नवल वाटलें. त्यांतल्या त्यांत सौ. पुष्पाबेन पारेख व कु. चित्राबेन पारेख या दोघी तर तें नांव ऐकतांच कमालीच्या चकित होऊन टकमक एकमेकींच्या तोंडाकडे पाहूं लागल्या.

"आपली शकुंतला जोशी ही ?" असें विचारीत पुष्पाबेन उंच मान करून व्यासपीठावर येणाऱ्या शकुंतला जोशीकडे पाहूं लागली.

चित्राबेनचीही अवस्था तशीच अगदीं गोंधळल्यासारखी झाली होती.

"तीच का ही शकुंतला जोशी ?" त्या लेकुरवाळ्या तरुणीच्या चर्या-दर्शनानें दिलेले होकार आणि तिच्या एकंदरींत 'कंगाल' वर्गांत मोडणाऱ्या वेषभूषेनें दिलेले नकार यांच्या पाठशिवणीच्या खेळांत गुरफटून गेलेल्या पुष्पाबेन व चित्राबेन या नणंदा–भावजया एकमेकींना शब्दांनीं व नजरेनें विचारूं लागल्या.

तेवढ्यांत शकुंतला जोशी व्यासपीठावर चढली. कडेवरच्या अडीच तीन वर्षांच्या गोंडस गोड मुलाला तिनें खालीं उतरलें. आईच्या शुभ्र पण जरा मळकट पातळाच्या निऱ्यांना बिलगून समोर पाहत उभा राहिलेल्या मुलाची चर्या लालजीनें काय, शेख मिरानें काय, पुष्पाबेन व चित्राबेन यांनीं काय, ओझरतीच पाहिली खरी. पण त्या ओझरत्या दर्शनानें त्यांचा तर्क अधिक गुंतागुंतीचा झाला.

"कुणासारखा दिसतो बरें या मुलाचा चेहरा ? आठवतो तुम्हांला लालजी ?" चित्राबेननें लालजीला हळूच हांक मारून विचारलें.

इतक्यांत शकुंतला जोशी बोलूं लागली. त्यामुळें लालजीला अध्यक्ष या नात्याचे सर्व शिष्टाचार पाळण्याच्या बंधनामुळें चित्राबेनच्या जिज्ञासेचा कुशल समाचार घेतां आला नाहीं.

" सोपाना वाघमारेच ना त्याचें नांव ? त्या न्हावी कामगाराचें ? " पुष्पाबेननें चित्राबेनला हलक्या स्वरांत विचारलें.

पण शकुंतला जोशीच्या भाषणाकडे चित्ताचा लय लागलेल्या चित्राबेननें तो प्रश्न ऐकून न ऐकलासा केला.

शकुंतला जोशी दहा पांच वाक्यें बोलते न बोलते, तोंच सभास्थानीं जमलेल्या जनसंमर्दांतून वेड्या पिसाटासारखा दिसणारा, पिंजारलेल्या गुंताळ केंसांचा, दाढी मिशांनीं चरबटलेल्या चेहऱ्याचा व तारवटलेल्या नजरेचा एक कंगाल मवाली तरुण मध्येंच उठून उभा राहिला. तो व्यासपीठाकडे टक लावून पाहूं लागला. रस्त्यावरील विजेच्या दिव्यांचा इतक्या लांबवर मंद प्रकाश पडत होता; व सभेसाठीं म्हणून आणलेली किटसनची एक बत्ती भडकून नुक्तीच विझली होती. त्यामुळें त्या तरुणाचा चेहरा सर्वांना नीट दिसत नव्हता.

त्या तरुणाचा तो अवतार पाहून कुणालाही भय वाटलें असतें, कीं हा कांहीं स्थिर मनाचा, पूर्ण शुद्धीवर असलेला माणूस नाहीं.

" ए बाबा ! खालीं बैस. " एक कामगार त्या कंगाल तरुणाला म्हणाला.

पण तो तरुण खालीं बसेना. तो कोण काय बोलतें इकडे लक्षच देईना.

तोंच आणखी दोघे तिघे म्हणाले, " अरे ए ! खालीं तरी बस, नाहीं तर बाजूला तरी जा. असा मध्यें उभा राहूं नकोस. "

त्या तरुणानें तें ऐकून एकदां तिटकाऱ्यानें कपाळाला आंठ्या घालून मागें वळून पाहिलें व ऐकलें न ऐकलेंसें केलें. त्याची नजर बेडकीवर खिळलेल्या सापाच्या नजरेसारखी व्यासपीठावरील मायलेंकरांवर खिळली होती.

आणि सारे लोक तर वक्ती स्त्री काय बोलते हें ऐकण्याला उत्सुक होते. हा एक तरुण रानदांडगेपणानें मध्येंच उभा राहिलेला विशेषतः त्याच्या मागील लोकांच्या डोळयांत खुपूं लागला. अखेर त्यांतील एकानें त्याला बकोटीला धरून सभेच्या बाहेर एका बाजूला काढून लावलें.

" जा, आतां बस तिकडे. डोकें शुद्धीवर आहे ना ? कीं पुन्हां जायचें आहे ठाण्याला ? " त्या कंगाल तरुणाला बाजूला काढून लावणाऱ्या त्या दुसऱ्या कामगार तरुणानें कांहींशा सहानुभूतीनें, पण किंचित् रागांत

गालांतल्या गालांत जरा हंसल्यासारखें करीत म्हटलें, व तो पुन्हां आपल्या जागीं जाऊन बसला.

" नायकोला भेटायला आला आहे वाटतें वेडा ! " एकजण म्हणाला.

त्या कंगाल तरुणानें त्या क्षणीं झटक्यासरसें एकवार मागें वळून त्या माणसाकडे पाहिलें.

तेवढ्यांत आजूबाजूच्या लोकांनीं हुश् हुश् सुरू केलें. तेवढ्यावरून 'ता' म्हणतां 'ताकभात' सर्वांनीं ओळखला.

मग कोणी कांहीं गडबड करीनासे झाले.

शकुंतला जोशी शांतपणानें पण सर्व प्रेक्षकांवर जाळें फेंकावें अशा आविर्भावांत बोलत होती. व्यासपीठावरील किटसन दिव्याच्या प्रकाशाचा झोत तिच्या तोंडावर पडला होता.

..." आपण आज अतिशय अडचणीच्या परिस्थितींत सांपडलों आहों हें तर उघड आहे. पण ह्या अडचणींतून बाहेर पडण्यासाठीं आपण घाबरून, भांबावून अथवा चिडून जातां उपयोगी नाहीं. त्या भरांत आगींतून उठून फोफाट्यांत उडी मारणें हा अविचार होईल. वेडेपणा होईल. महायुद्धाचा वणवा साऱ्या जगभर भडकला आहे. आपला देशही त्या वणव्यांत सांपडला आहे. आपणाला बळजबरीनें ह्या युद्धाच्या भडकत्या खाईंत ओढण्यांत आलें आहे. आपलीं माणसें, आपला असेल नसेल तो पैसा, आपणाला पिळून पिळून आपल्या अंगीं असेल नसेल तो सामर्थ्याचा—रक्ताचा थेंबन् थेंब रणांगणावर आसुरी थैमान घालणाऱ्या हिंसाराक्षसिणीची रक्ताची तहान भागविण्यासाठीं निपटून नेला जात आहे. महायुद्धाची भडकलेली आग आपण अशी तेलानें विझवूं पाहत आहों. पण आगींत तेलाचा शिडकाव करून आग विझत नाहीं, अधिक पेटते. अधिक भडकते. ही आग जितकी अशी तेलानें विझवूं जावें, तितकी ती अधिकाधिक भडकत जाईल. आजवर अनेक राज्यकर्ते आले. आपापल्या परीनें भारताला गुलामगिरींत डांबून आपल्या मतलबासाठीं पिळून नाडून त्या राज्यकर्त्यांनीं अनेकदां आपल्या भारतमातेला तिच्या संतानांच्या रक्ताचें स्नान घातलें. तसाच रक्तपात जगभर सतत चालू राहावा, माणुसकीचा संहार व्हावा, असें कोणाला वाटेल ? हां ! आपणाला लढलें तर पाहिजे. पण आपला

लढा आपल्या व साऱ्या जगाच्या माणुसकीच्या रक्षणासाठीं व माणुसकीची जोपासना करून वाढ करण्यासाठीं आहे. आज जगांतील लोकशाहीच्या नांवावर चालू असलेला भयंकर संहार माणुसकीची वाढ करणारा आहे काय?..."

मध्येंच सभेंतून आवाज उसळूं लागले.

"इंग्रज हा आपला पहिल्या नंबरचा शत्रू आहे. भारताची सर्व बाजूंनीं अशी दुर्दशा इंग्रजानें केली आहे..."

"आम्हांला इंग्रजी साम्राज्यसत्तेचा नायनाट करायचा आहे. इंग्रजांच्या मगरमिठींतून आपल्या देशाची सुटका करायची आहे. गुलामगिरीच्या अवजड शृंखला तोडून आम्हांला अगदीं मोकळें—अगदीं स्वतंत्र व्हायचें आहे...."

शकुंतला जोशी स्मितपूर्वक पण निर्धारी स्वरांत पुढें बोलूं लागली, "होय. बंधूंनो! आपणांला अगदीं मोकळें—अगदीं स्वतंत्र व्हायचें आहे. याबद्दल कोणाचेंच दुमत नाहीं. प्रश्न एवढाच आहे कीं आपण आजच्या गुलामगिरींत रणगाडे ओढून, युद्धांत भाग घेऊन ह्या गुलामगिरीपासून मुक्त होऊं शकतों कीं काय?..."

## ३

सभेंतील वातावरण पुन्हां तापूं लागलें. शांतपणें व्याख्यान ऐकण्याची लोकांची मनःस्थिति उष्णतेनें धुक्याची वाफ व्हावी तशी पालटूं लागली. कुठेंही गेलें तरी खळबळ उडविणारे धडाडीचे लोक आरंभीं अगदीं थोडे असतात खरे. परंतु आगीची एक ठिणगी देखील खांडववनांतील आगीसारखा वणवा पेटवायला पुरते. ठिणगीवरून ठिणगी पेटत जाते. वणवा भडकत जातो. महायुद्धाचें स्वरूप दिवसेंदिवस अधिक उग्र होऊं लागलें होतें. तिकडे युरोपांत जर्मनीनें रशियाचा निःपात चालविला होता. रशिया म्हणजे दोस्त राष्ट्र. फासिझमच्या साऱ्या जगावर ओढवणाऱ्या संकटाशीं झगडून जगांतील लोकशाहीचें रक्षण करण्याच्या निमित्तानें इंग्लंड, अमेरिका

वगैरे 'लोकशाही' राष्ट्रांनीं रशियाशीं दोस्ती केली होती. अर्थात् रशियाचा जय–पराजय म्हणजे सर्व दोस्त राष्ट्रांचा जय–पराजय होता. भारतानें ह्या युद्धांत आपलें नैतिक पाठबळ लोकशाही राष्ट्रांना द्यावें, अशा आशयाची मानभावी मनधरणी करण्यासाठीं दिखाऊ राजकीय सुधारणांचें मायाजाल भारतावर पसरण्याकरितां विलायतेंतून आलेला ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधि सर स्टॅफर्ड क्रिप्स जसा आला तसा गारुड्याची पोतडी गुंडाळून माघारा गेला होता. महायुद्ध सुरू झाल्यावर काँग्रेस मंत्रिमंडळांनीं राजीनामे दिल्यापासून इथवर काँग्रेसनें जे जे प्रयत्न भारतांतील लोकक्षोभ आवरीत आवरीत, हिंसा व द्वेष टाळीत केले, त्या सर्व प्रयत्नांवर क्रिप्सच्या मानभावी शिष्टाईमुळें पाणी पडल्यासारखें झालें होतें. त्या संतापाच्या भरांत भारतांतील सर्वसाधारण जनतेच्या अंतःकरणांतील इंग्रजविरोधी भावना अगदीं कळसाला पोहोंचल्या होत्या. जनतेच्या सहनशक्तीचा अगदीं कडेलोट झाला होता. ह्या कुचंबणेंतून मुक्त होण्याला लढा दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं असें सर्वांनाच वाटत होतें. जनतेचा क्रोधाग्नि भडकला होता. जर्मनी व जपान या गट्टीराष्ट्रांच्या आकाशवाणीवरून जनतेचा क्षोभ इंग्लंड–अमेरिका–रशिया आदि दोस्त राष्ट्रांविरुद्ध प्रचाराची कमालीची झोड रोज रोज वाढत्या वेगानें उडविली जात होती.

भारताची गुलामगिरी काय केल्यानें टळेल, भारताचें खरें कल्याण कशांत आहे, याचा सारासार विचार करण्याइतकी चित्ताची समतोलता राखणें महान् पुढाऱ्यांना देखील राखतां येणें अशक्यप्राय होत होतें; तिथें सामान्य जनतेची तर गोष्टच बोलायला नको.

"आपण आजच्या गुलामगिरींत रणगाडे ओढून युद्धांत भाग घेऊन ह्या गुलामगिरीपासून मुक्त होऊं शकतों काय?" हा शकुंतला जोशीचा प्रश्न जितका बिनतोड होता, तितक्याच बिनतोडपणानें सभेंतून तिला उत्तर मिळालें, "होय. मुक्त होऊं शकतों."

शकुंतला जोशीनें त्या वेळच्या सभेंतील खळबळजनक वस्तुस्थितीचा विचार करून सावधानतापूर्वक आपला भाषणाचा पवित्रा जरा बदलला. तिला माहीत होतें कीं आपला शांतिपाठ ऐकून घेण्याच्या परिस्थितींत लोक नाहींत. पण तिला लोकमताच्या प्रक्षोभकारक लोंढ्याबरोबर वाहतही

जायचें नव्हतें; व तो लोंढा अडविण्याला पुरेशी ताकद आपल्या अंगीं आहे असा आत्मविश्वासही तिला वाटत नव्हता. तरीही तिनें आतां ह्या खळाळत्या प्रवाहांत उडी घेतलीच होती; आतां प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें कांहीं काळ पोहत जावें लागलें तरी त्याला डगमगणारी ती नव्हती.

"जपान भारताला इंग्रजांच्या गुलामगिरींतून मुक्त करायला समर्थ आहे. सर्वप्रकारांनीं भारताला पाठिंबा द्यायला जपानची तयारी आहे. जपानची मदत भारतानें स्वातंत्र्य संपादन करण्याच्या कामीं कां घेऊं नये? गांधींचा या गोष्टीला विरोध कां असावा?" सभेंतून एक भगवी खादी टोपी धारण केलेला निमगोरा तरुण नदींतून पाणी कापीत जाणाऱ्या नावेसारखा व्यासपीठाकडे प्रश्न विचारीत येतां येतां उद्गारला.

त्या तरुणाच्या दृष्टीला दृष्टि भिडतांच शकुंतला जोशी क्षणभर बुचकळ्यांत पडल्यासारखी झाली. तीन वर्षांपूर्वी काँग्रेसच्या तिरंगी झेंड्यावरून पंचप्राणांची कुरवंडी करायला उत्साहानें तयार असणारा हा चिंतामणि वर्तक आज इतका भगवा झाला तरी कसा, याचा तिला अचंबा वाटला.

अध्यक्ष लालजीनेंही त्याला ओळखलें. अनेक महिने सन १९३७ मध्यें त्यांनीं एकत्र येरवड्याच्या तुरुंगांत काढलेले. अनेकदां अनेक विषयांवर त्यांचा वादविवाद झालेला. पण शकुंतला जोशीनें लालजीच्या चर्येकडे पाहिलें; तों तिला तो अगदीं निर्विकार दिसला.

चिंतामणि वर्तकच्या प्रश्नाला शकुंतलानें प्रतिप्रश्नानें उत्तर दिलें, "जपान जर एवढा लोकशाहीचा भोक्ता आहे, जनतेच्या स्वातंत्र्याची जपानला जर एवढी कळकळ वाटते, इंग्रजी साम्राज्यशाहीच्या जड जोखडाखालून भारतमातेची मान सोडविण्याच्या जपानच्या इच्छेंत जर कांहीं सत्यता आहे असें आपण मानायचें, तर जपानच्या साम्राज्यशाही जुलमाखालीं भरडल्या जाणाऱ्या चीनची वाट काय? चीनला आपल्या साम्राज्यशाही गुलामगिरींत अमानुष जुलुमानें जखडून ठेवण्यासाठीं स्वातंत्र्यप्रेमी चिनी जनतेची लांडगेतोड करणारा जपान भारताला स्वतंत्र करण्यासाठीं सद्धेतुपूर्वक सहकाराचा हात पुढें करीत असेल असें आपणाला मुळींच मानतां येणार नाहीं...."

शकुंतलाच्या तोंडचें वाक्य पुरं होतें न होतें, तोंच तिच्या डावीकडून कुठूनसा लहानशा नारळाएवढा दगड भिरभिरत आला तो नेमका तिच्या कपाळाला वर्मी लागला. कपाळावर मोठी खोंक पडून तिच्यांतून भळभळां रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. त्या रक्ताचे ओघळ तिच्या गालांवरून नेसलेल्या पातळावर वाहूं लागले. दोन्ही हातांनीं कपाळ दाबून घरीत ती तिरिमिरी आल्यासारखी मटकन् खालीं बसली.

सभेंत एकच गोंधळ माजला. पण दगड फेंकून मारणारा तो कंगाल तरुण भेसूर मुद्रा करून तो देखावा न्याहाळीत बाजूला उभा होता.

त्याला दगड फेंकून मारतांना अनेकांनीं पाहिलें होतें. ते एकदम त्याच्यावर तुटून पडले.

" अरे, नका मारूं त्याला. वेडा आहे तो. पुन्हां वेडाची लहर आली असेल... " त्या गर्दींतून वाट काढीत सभाध्यक्ष लालजी त्या कंगाल तरुणाकडे वळून म्हणाला, " सोपाना! वेड्या! काय केलेंस हें ? "

तिकडे व्यासपीठावर जखमी स्थितींत बेशुद्ध पडलेल्या शकुंतलाला उपचारांसाठीं इस्पितळांत पोंचविण्याच्या धांदलींत चित्राबेन व पुष्पाबेन गुरफटून गेल्या होत्या. भीतीनें अगदीं गर्भगळित झालेल्या त्या आईच्या लेकराला उचलून घेऊन सांभाळीत चित्राबेन बेशुद्ध शकुंतलाला आपल्या मोटारींतून इस्पितळाकडे नेतांना बाजूला वळून पाहते तों खवळलेले लोक त्या कंगाल सोपानाला बडवीत तुडवीत हाकलीत इस्पितळाकडे घेऊन चालले होते.

लालजीनें सोपानाला त्या लोकांच्या हातून सोडविण्याचा प्रयत्न केला. पण कोणीं त्याला दाद दिली नाहीं.

## ४

डॉ० परमानंदांचें इस्पितळ म्हणजे गरिबांचें मायपोट. आपल्या वैद्यकीय ज्ञानाचा उपयोग रंजल्यागांजल्यांच्या सेवेंत करणाऱ्या थोड्या परोपकारी डॉक्टरांपैकीं डॉ. परमानंद हे एक होते. चित्राबेनच्या ऋणानुबंधांतील डॉक्टर ते. शिवाय जवळच त्यांचें इस्पितळ होतें.

शकुंतलाला चित्रा त्याच इस्पितळांत घेऊन गेली. आणि मागाहून शकुं-तलावर हल्ला करणारा मारेकरी कंगालही लोकांनीं तिथेंच आणून सोडला.

समाजांत किंमत शकुंतला जोशीला माणूस म्हणून नव्हती. ती थोरां-मोठ्यांची मुलगी व विशेषतः थोरांमोठ्यांची सून, पत्नी, म्हणून होती.

एवढ्या मोठ्या मुंबई शहरांतील ती हजार पांचशें लोकांची सभा म्हणजे तसें पाहतां दर्यामें खसखस. पण त्या सभेचा इतिहास शकुंतला जोशीच्या रक्तानें लिहिला गेला, म्हणून तिला महत्त्व आलें. वर्तमानपत्रांतून त्या सभेची वार्ता खुलवून फुलवून प्रसिद्ध झाली.

आणि त्या प्रसिद्धीबरोबर पूर्वेतिहासाच्याहि लहानमोठ्या बखरी आणि सत्यकथा प्रसिद्ध झाल्या. शकुंतला जोशी दोन वर्षांपूर्वी गृहत्याग करून गेल्यापासून जी बहुतेक अंधारांत होती, ती त्या सभेच्या निमित्तानें एक-दम उजेडांत आली.

शकुंतलाला सभेंत त्या दगडानें झालेली जखम तशी म्हणण्याजोगी भयं-कर नव्हती. परंतु ती जखम करणाऱ्या माणसाच्या इतिहासानें ती जखम जास्त चिघळविली होती.

त्या रात्रौ सुमारें तासभरानें शकुंतला शुद्धीवर आली. तेव्हांही चित्राबेन तिच्या उशालगत समाचारासाठीं बसली होती. शकुंतलाच्या घाबरलेल्या लहानग्या मुलाला तिनें आपल्या मांडीवर बसवून घेऊन गोड शब्दांनीं त्याची समजूत घालविली होती. पुष्पाबेन मात्र थेट आपल्या बंगल्यावर निघून गेली होती. तिला कंगालांचा सहवास कंटाळवाणा वाटे. आणि डॉ. परमानंदांचें इस्पितळ म्हणजे तर कंगालांची धर्मशाळा. त्या धर्मशाळेंत कोट्याधीश गिरणीमालकाची बहिण आणि धनकुबेर माजी गृहमंत्र्यांची सून कां म्हणून जाऊन बसेल ?

दोन वर्षांपूर्वीची शकुंतला जोशी आणि आजची शकुंतला जोशी या दोहींच्यामध्यें दोन वर्षांच्या कालखंडाचें घनदाट धुकें सांचलेलें होतें. त्या धुक्याच्या पलीकडे दोन वर्षांपूर्वी आपल्या वैभवशाली गडगंज संसारांत मानससरोवरांतील कलहंसीप्रमाणें विहरणारी शकुंतला अदृश्य झालेली तिच्या आप्तेष्टांना व मित्रमैत्रिणींना, सासूसासऱ्यांना, मातापितरांना, पतीलाही आतां केवळ कल्पनेनेंच हुडकून काढून ओळखावी लागत होती.

आज सर्वांसमोर येऊन उभी राहिली होती ती कंगाल शकुंतला.

" खरेंच ? " शकुंतलानें त्या दिवशीं शुद्धीवर आल्यावर जेव्हां आपल्या जिवावर भर सभेंत उठलेल्या मोरकऱ्याचें नांव सोपाना आहे असें ऐकलें तेव्हां कांहीं तरी अघटित घटना घडल्यासारखी चर्या करून विचारलें.

" होय. " चित्राबेन उत्तरली, " तो नुकताच वेड्याच्या इस्पितळांतून सुटून आला आहे म्हणतात. सोन्यासारखा कामगार, पण वायां गेला हो, अगदीं वायां गेला. माणसाच्या बुद्धीला कधीं कसा भ्रंश होईल कांहीं नेम सांगतां येत नाहीं. बाकी, असल्या वेडाला कांहीं औषध नाहीं, नाहीं ग शकू ? "

दाटून आलेला गळा त्यावरून हात फिरवून मोकळा करण्याचा लटका प्रयत्न करीत रुद्ध स्वरांत शकुंतलानें विचारलें.

चित्राबेननें आश्चर्य व्यक्त करीत विचारलें, " तुला माहीत नाहीं ? "

" नाहीं. मला माहीत नाहीं. " शकुंतला उत्तरली.

तेवढ्यांत इस्पितळाचे डॉक्टर रोग्याच्या प्रकृतीची विचारपूस करण्यासाठीं आले आणि तो विषय तेवढ्यावरच राहिला.

" मला कांहीं विशेष झालें नाहीं डॉक्टर ! " शकुंतला बिछान्यावर उठून बसतां बसतां हंसतमुखानें म्हणाली.

" छे ! छे ! तुला कांहींच विशेष झालें नाहीं. पण तूं मात्र अनेकांना झाली आहेस. " चित्राबेन लगेच स्मित हास्य करीत उद्गारली, तिनें लगेच बोलतां बोलतां डॉक्टरांकडे वळून पाहत विचारलें, " मी बोलल्यें तें खरें कीं खोटें डॉक्टर ? "

" तें त्यांना आणि तुम्हांला माहीत. " डॉक्टर हंसरी चर्या करीत म्हणाले.

" म्हणजे कशी ? " शकुंतलानें नवलाईच्या जाणिवेनें भुंवया चढवीत डॉक्टर व चित्राबेन या दोघांकडे नजर फिरवीत विचारलें, " रोगासारखी का मी कुणाला झाल्यें आहें ? "

चित्राबेन यावर कांहीं न बोलतां डॉक्टरांकडे पाहून नुसती हंसली.

डॉक्टर समोर हंसरेपणाची ओझरती झुळूक गालांवरून खेळवीत, कांहीं न बोलतां पण कसल्या तरी गूढ विचारांत पडल्यासारखे उभे होते.

" खरें डॉक्टर ! मी तुम्हां दोघांची एकमेकांना ओळख करून द्यायचा शिष्टाचार अगदींच विसरल्यें. ही माझी बाळमैत्रीण खासगी नात्यांत अगदीं जिव्हाळ्याची पण राजकारणांत अगदीं विळयाभोंपळयाइतकें सरळ अशी चमत्कारिक मैत्रीण शकुंतला जोशी." लगेच ती शकुंतलाकडे पाहून म्हणाली, " काय ग ए ! घर सोडलेंस तसें घराण्याचें नांवही सोडलें नाहींस ना अजून ? "

" नांव कसें सोडायचें बाई ? नांव नको असतांनाही योगायोगानें कपाळाला चिकटतें. पण एकदां कपाळावर कोरलें गेलेलें नांव सोडायचें, तर जगाकडून नांवें ठेवून घ्यायची मनाची तयारी करावी लागते."

" तितकी तयारी तुझ्या मनाची अजून झाली नाहीं ? " चित्राबेननें विचारलें.

शकुंतलानें एक उसासा सोडून खालीं मान घातली. ती कांहींच बोलेना.

" बरें पण आपली ओळख अर्धवटच राहिली. डॉक्टर ! शकुंतला जोशी म्हटल्यावर बाकीच्या साऱ्या गोष्टी तुम्हांला माहीत आहेत. नव्यानें सांगायला नकोत. आणि माझ्या या मैत्रिणीविषयीं जें तुम्हांला माहीत नाहीं, तें मलाही माहीत नाहीं." चित्राबेन शकुंतलाकडे वळून म्हणाली, " आणि हे आमचे डॉक्टर परमानंद. "

" डॉक्टर परमानंद ! " शकुंतला डॉक्टरांच्या चर्येकडे सहेतुक आदर-भावानें पाहत व तशीच नजर चित्राबेनकडे वळवीत म्हणाली.

" असले परिचयाचे शिष्टाचार पाळायची जागा घर हीच ना चित्राबेन ! मला वाटतें, आपण यांना आपल्या घरीं न्यावें." डॉक्टरांनीं आपुलकीनें विचारलें, " शकुंतलाबेन ! तुमची याला कांहीं आडकाठी नसेल असें मला वाटतें. "

" आडकाठी तशी कांहींच नाहीं..." मांडीवर झोंपी गेलेल्या शकुं-तलाच्या अशोकला हलक्याफुल हातांनीं चित्राबेननें बिछान्यावर ठेवला, त्याला कुरवाळीत व त्याच्या गोबऱ्या बाळगालाचा एक गोडसा पापा घेत शकुंतला म्हणाली, " दया आहे का मुंबईत अजून ? "

" म्हणजे ? " चित्रा म्हणाली, " ती देखील आपल्याच पंथांतील आहे असें तुला वाटतें का ? "

"मी मध्यें बोलतों याबद्दल क्षमा करा. पण चित्राबेन ! यांना—"

तोंच मागोमाग आलेली दया हजरजबाबीपणानें म्हणाली, "त्यांना आमच्या घरीं नको. त्यांच्या घरीं जाऊं द्या. नाहीं तर उगीचच लोकांची बायको फितवल्याचा आरोप आमच्यावर यायचा." दया उद्गारली. आणि बोलतां बोलतां पहांटेच्या उमलत्या कळीसारखी गालांतल्या गालांत हंसली.

जशासतसें या न्यायानें तो थट्टाविनोदाचा चेंडू थट्टाविनोदाच्या फटकाऱ्यासरसा उलटा भिरकावून द्यावा असें शकुंतलाला एकदां वाटलें. 'दुसऱ्याची बायको फितवल्याचा आरोप कांहीं यायचा नाहीं; पण दुसरीचा नवरा फितवल्याचा आरोप मात्र तुमच्यावर येण्याचा संभव आहे खरा.' हे शब्द तिच्या अगदीं ओठावर आले होते. पण ते तिनें ओठांतल्या ओठांत गिळून टाकले.

मैत्रिणीमैत्रिणींची गांठ पडली, आतां आपण आपल्या कामाला जायला हरकत नाहीं, पाहुण्यांचें यथास्थित आदरातिथ्य आपली बहीण करील; असा स्वाभाविक विश्वास बाळगून डॉक्टर इतर रोगी पाहण्यासाठीं निघून गेले.

बोलतां बोलतां दयानें शकुंतलाच्या बिछान्यावर झोंपी गेलेल्या अशोकला उचलून घेऊन त्याचे मटामट कितीतरी मुके घेतले. आणि उजव्या हाताच्या बोटानें अगदीं हळुवारपणें त्याच्या गालावरील नाजुक खळीला स्पर्श करीत विचारलें, "काय रे, ए गुलामा ! आहे का मावशीची ओळख ? बाकी, किती झाली तरी पुरुषांची जात. बेमान निपजली नाहीं तर नवल !"

दया ओघासरसें बोलून गेली खरी. पण लगेच तिचें तिलाच हुरहुरल्यासारखें वाटलें.

"चला. आमचा बंगला अगदीं जवळच आहे." दया मुलाला घेऊन चालूं लागली.

"बंगल्यांत येऊं ?" शकुंतलानें जरा विचारांत पडल्यासारखें करून विचारलें.

"खुशाल या. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. मी तुमच्या मर्जीविरुद्ध कांहीं देखील होऊं देणार नाहीं."

" स्वखुषीनें घराला पारखी झालेली सत्याग्रही आहें मी. "

" होय ना ! माहीत आहे तें मला. जातांना तुम्हीं जयंतांना लिहिलेलें पत्र मीं वाचलें आहे.—"

तेवढ्यांत दुसरी एक नर्स पुढें येऊन सांगूं लागली, " दयाबाई ! सकाळचा पेशंट आतां आपण घरीं जातों म्हणतो. जाऊं द्या त्याला ? "

" आउटडोअर पेशंटच आहे ना तो ? " दयानें विचारलें.

" होय. जाऊं द्या ? " त्या नर्सनें पुन्हां विचारलें.

" डॉक्टरांच्या कानीं घाला आणि मग जाऊं द्या त्याला डॉक्टरांनीं सांगितलें तर. पण पाहा नीट त्याला. डॉक्टर म्हणत होते कीं बराच मुका मार लागला आहे त्याला. कांहीं दिवस इस्पितळांत राहिला तर बरा. "

" पण तो कांहीं केल्या इस्पितळांत राहायला तयारच नाहीं ना ! डॉक्टरांनीं आम्हांला सांगून ठेवलें होतें, तो शुद्धीवर आल्यावर त्याला आजचा दिवस तरी इस्पितळांत राहायला सांगाच म्हणून–" नर्स म्हणाली.

" मग काय करणार त्याला ? नाहीं राहत तर जाऊं द्या. " दया म्हणाली, व चालूं लागली.

" मी जाऊं आतां शकू ? " चित्राबेन म्हणाली.

" जा ना ! पण पुन्हां केव्हां भेट ? आतां कांहीं दिवस तरी मी मुंबईतच आहें म्हणा. " शकुंतला म्हणाली.

" पण कुठें ? ना सासरीं ना माहेरीं. खरें ना ? "

चित्राबेननें तो अवखळ प्रश्न विचारला खरा. पण त्याचें उत्तर म्हणजे शकुंतलाकडून मिळेलच अशी तिची अपेक्षाही नव्हती; आणि तें मिळालेंही नाहीं.

बाकी, मिळालें नाहीं शब्दांनीं. त्या प्रश्नासरशीं शकुंतलाच्या नजरेंत तरळूं लागलेली कारुण्यभावना जें काय बोलायचें तें बोलून गेली.

" विचारलें तर रागावणार नाहीं ना तुम्ही शकुंतलाबाई ? " दयानें बंगल्याच्या आवारांत प्रवेश करतां करतां प्रश्न केला.

" रागावण्यासारखें विचारणार आहां का कांहीं तुम्ही मला ? तर विचारा. कांहीं हरकत नाहीं. दुसऱ्यावर रागावायची संवय मीं आतांशा

बरीच मोडीत आणली आहे. तुम्ही मला कांहींही विचारा. हं! काय विचारायचें आहे ?"

"खरें पुरें पुरें विचारायचें आहे तें विचारीन तुम्हांला मी रात्रीं नाहीं तर उद्यां. पण मला अगोदर सांगा, मुंबईत तुमचा ठावठिकाणा कुठें आहे असें समजावें आम्हीं ?"

"आपला देश दरिद्री आहे ना दयाबाई ? जिथें दारिद्र्य आहे तिथें नारायणाची वस्ती आहे, आणि जिथें नारायण आहे तिथें मी आहें. तुम्हां थोरांमोठ्यांच्या घरींदारीं पाहुणी मी, परकी. आमचें जग म्हणजे गोरगरिबांचें जग. इतकेंही करून माझें मुंबईतलें बिऱ्हाड तुम्हांला पाहायचें असलें तर मी तें उद्यां दाखवीन कीं तुम्हांला."

त्या रात्रीं शकुंतला तें बोलून गेली तें इतक्या सहजपणें, कीं त्यांत संकोचाचा अथवा ओशाळेपणाचा लवलेशही नव्हता. ती आतां आपणापेक्षां अगदीं निराळ्या जगांत वावरूं लागली आहे, तिनें समाजांतील आपले पूर्वीचे सारे भवबंध तोडून टाकून स्वतःसाठीं गरीबांचें व गरीबीचें नवें निराळें जग शोधून काढलें आहे व त्या जगांत ती सुखासमाधानानें राहायला शिकली आहे, याची दयाला पुरी ओळख पटली.

उण्यापुऱ्या दोन वर्षांत इतका क्रांतिकारक फरक हिच्यांत घडून तरी कसा आला ? हा प्रश्न दयाच्या मनांत शकुंतलाची भेट झाल्यापासून एकसारखा घोळूं लागला होता.

दयाला त्यांत आनंदही वाटत नव्हता, व दुःखही वाटत नव्हतें. पण ज्यानें तिला बाळपणापासून लळा लावला होता, व ज्याच्यासाठीं तिला पावलोपावलीं चुकल्या चुकल्यासारखें होत असे, तो तिचा ऋणानुबंधाचा बालक अशोक तिला अचानक आज मिळाला, त्यांत तिला त्रिभुवनांतील आनंद हातीं आल्यासारखा आनंद झाला होता.

त्या रात्रीं बंगल्यांत पाऊल टाकल्यापासून तिला धड जेवणखाण सुचलें नाहीं, धड दुसरें कांहीं काम अथवा गप्पागोष्टीही सुचल्या नाहींत. इतकी ती दुधांत साखर विरघळून दुधाशीं एकरूप व्हावी तशी त्या बालकाशीं एकरूप होऊन गेली होती.

आणि नवल असें, कीं तें एवढेंसें चिरमुडलें लेंकरूं; पण इतक्या

लाघवीपणानें दयाला तिच्या पांखरमायेंतून भिडलें होतें कीं कोणा त्रयस्थ पाहणाराला वाटावें, ह्या आईचेंच हें लेंकरूं हरवलें होतें, तें आज तिला सांपडलें आहे.

तो गुलाम खेळतां खिदळतां झोंपीं गेला तो देखील दयाच्या मायमिठींत, आणि दयानें त्याला झोंपवलें तेंही आपल्या बिछान्यावर.

" इतक्या दिवसांनीं गुलामाला त्याची खरी आई सांपडली. आतां मी संसारांतील ह्या अखेरच्या मायापाशांतून मुक्त झाल्यें. नाहीं दया ! जन्माला आल्यासारखें ज्यांचें ज्यांचें देणें या जन्मींचें अथवा पूर्व जन्मींचें माझ्या शिरावर होतें, त्यांना त्यांना त्याची फेड करीत आल्यें. माझ्या पायांतली अखेरची बेडी आज तुटली.... "

तें दयाच्या ध्यानीं आलें नाहीं. पण बोलतां बोलतां शकुंतला मनांतल्या मनांत जरा कचरली. तिला सोपानाची आठवण झाली.

" बेडी तुटली असेल. पण मायेममतेचे रेशमाहून मऊ परंतु बळकट पाश माणसाला असे तोडून तोडतां येतात का हो ? " दयानें अंतश्चक्षूंपुढें पंढरपूरच्या पांडुरंगाप्रमाणें उभा ठाकलेल्या जयंत जोशीकडे न्याहाळून पाहत विचारलें.

# घराबाहेर

डॉक्टर विश्रांतीचा घटकाभर वेळ पाहुण्या शकुंतलाच्या संगतींत घालविण्या-साठीं आंत आले. त्यांच्या आगमनाच्या हलक्याशा धक्क्यासरशीं लाजा-ळूच्या पानांसारखीं त्या दोघींचींही अंतःकरणें त्या गूढ विषयापुरतीं मिटलीं.

" हं ! आतां सांगा शकुंतलाबाई ! तुमचा घर सोडून गेल्यापासूनचा अनुभव. " डॉक्टर शकुंतलाजवळच्या खुर्चीवर बसतां बसतां म्हणाले.

" अनुभव काय सांगूं डॉक्टर ? " शकुंतला कांहींशी गहिंवरून म्हणाली.

" नाहीं; तुम्हीं तुमचा सुखाचा जीव आपण होऊन असा दुःखाच्या खाईंत फेंकून दिला; हा जीवनांतील फरक तुम्हांला कसा काय मानवला हें मला समजून घ्यायचें आहे. म्हणून विचारतों. मला वाटतें, रामगडच्या कॉंग्रेसला तुम्ही गेलां त्या कांहीं पुन्हां माघाऱ्या घरीं आलां नाहीं. नाहीं ना ? "

दया उद्गारली, " घरीं नाहीं आणि माहेरींही नाहीं. "

" रामगडच्या कॉंग्रेसला गेल्यें मी, ती निघून थेट घरीं गेल्यें. " शकुंतला उद्गारली. तिच्या त्या उद्गारांत प्रभातकाळीं पानांमागें दडलेल्या फुलाच्या कळीसारखें वैराग्य दडलें होतें. पण त्या कळीचा सुगंध जणूं त्या खोलीभर दरवळूं लागला होता.

" मला माहीत आहे शकुंतलाबाई ! घर घर नव्हेसें वाटावें इतकें खडतर जीवन घरांत जगण्याचा प्रसंग तुमच्यावर कसा आला होता याची मला पूर्ण जाणीव आहे. जयंतांशीं मी त्यानंतर या बाबतींत पुष्कळ बोललोंही. माझ्या माहितीप्रमाणें तुम्हांला घर सोडायला कारण हा तुमचा चिमणा वीर. होय ना ? "

" नाहीं. हा चिमणा वीर मला घर सोडायला लावणारा नव्हे, मला माझ्या घराची वाट दाखवणारा. " शकुंतला बोलून गेली. तेव्हां तिची नजर समोर गाढ झोंपीं गेलेल्या अशोकवर खिळली होती.

डॉक्टरांनीं दयाकडे पाहिलें; दयानें डॉक्टरांकडे पाहिलें. दोघांचेही नेत्रसंकेत गंभीर व अर्थपूर्ण होते.

" ह्या लेकरानें मला संसाराच्या मोहनिद्रेंतून जागें केलें डॉक्टर! यानें मला समजावून सांगितलें कीं वाट चुकून कुणीकडे भलतीकडे आली आहेस तूं वेडे ही! माणुसकीच्या जगाला पारखी होऊन आणखी किती दिवस अशी आपली वंचना करणार आहेस?... "

" खरें आहे तुम्ही म्हणतां तें शकुंतलाबाई! अगदीं खरें आहे. जयंतानें तुम्हांला माणुसकीच्या जगाला पारखें केलें होतें हें अगदीं खरें आहे." डॉक्टर म्हणाले.

" कोणती स्वाभिमानी आणि प्रामाणिक स्त्री असला भयंकर दुष्ट आरोप हकनाहक सहन करून त्या संसाराच्या खातेऱ्यांत डुंब्रत राहण्यांत आनंद मानील बरें? मला सांगा डॉक्टर!"

बोलतां बोलतां शकुंतलाच्या डोळ्यांना खळकन् पाणी आलें.

" प्रत्यक्ष पतीनें पत्नीच्या चारित्र्याविषयीं असा भलता संशय घ्यावा, यापेक्षां दुर्दैवाची गोष्ट कोणती?" दया झोंपीं गेलेल्या अशोकच्या बाळ-मुखावर फुलपांखरासारखी नजर फिरवीत म्हणाली.

" माझ्या जीवनांतील अपघात व उत्पात सारे तुम्हांला माहीत आहेत असें मी धरून चालत्यें डॉक्टर!"

" नाहीं हो! त्यांना कांहीं माहीत नाहीं. त्यांना इसापच्या गोष्टींत मनुष्यानें काढलेलें सिंहाचें चित्र माहीत आहे." दया मध्येंच म्हणाली.

" होय? तर मी आतां तुम्हांला सिंहानें काढलेलें मनुष्याचें चित्र दाखवत्यें. म्हणजे वस्तुस्थितीची पुरी पुरी ओळख पटेल तुम्हांला डॉक्टर! मला तुम्ही अगोदर असें सांगा, माणसानें माणसावर प्रेम करणें हा अपराध आहे का?"

डॉक्टर विचारी व सुजाण खरे. पण शकुंतला त्यांना तिच्या जन्मापासून आजवरच्या तेवीस चौवीस वर्षांच्या गतकालीन जीवनरूपी उजाड अरण्याच्या सीमेवर उभी राहून बोलत असल्यासारखी दिसत होती. त्यांच्या मतें काय राम उरला होता आतां तिच्या जीवनांत? ऐन उमेदीचें आयुष्य देखील जर माणसाला असें दारुण मनोव्यथांच्या धगधगत्या निखाऱ्यांवरून फरफटल्या-

सारखें काढावें लागलें, तर तें आयुष्य कसलें ? आणि असल्या यातनामय जीवनाचें परिवर्तन घडवूं पाहणाऱ्या शकुंतलाला ते दोष तरी कोणत्या तोंडानें देणार ?

" कुणालाही बुचकळ्यांत पाडण्याइतका माझा प्रश्न अवघड नाहीं डॉक्टर ! " शकुंतला कांहीं क्षण स्तब्ध होती, ती पुन्हां म्हणाली.

" अवघड नाहीं कसा ? " डॉक्टर म्हणाले, " माणूस आणि मनुष्य-प्राणि यांत फार मोठें अंतर आहे हें तुमच्या अनुभवाच्या प्रकाशांत आम्हांला स्पष्ट दिसत आहे. "

" त्या मनुष्यप्राण्याच्या अंगावरचीं सर्व संपत्तीचीं, विद्वत्तेचीं, मान-सन्मानाचीं टरफलें बाजूला करून त्यांच्या आंतील माणसाकडे पाहून बोला. माणसानें माणसावर प्रेम करणें हा गुन्हा आहे का ? "

" नाहीं. " डॉक्टर मनमोकळेपणानें उत्तरले.

" पण तुमच्या समाजानें मला त्यासाठीं गुन्हेगार ठरवलें. आणि त्या गुन्हेगारीबद्दल ही लग्नाची—जन्मठेपेची शिक्षा मला दिली. " बोलतां बोलतां शकुंतला रखरखत्या वाळवंटांत उसंत घेण्यासाठीं थांबणाऱ्या प्रवाशासारखी क्षणभर थबकली.

डॉक्टर व दया तें ऐकून एकमेकांच्या चर्येकडे टकमक पाहूं लागलीं.

" शिक्षाच नव्हे का ही डॉक्टर ? माणसाचें शरीर कोणीं कापलें तर जेवढ्या वेदना होत नाहींत, तेवढ्या वेदना माणसाच्या मनावर घाव पड-ल्यानें होतात. माणसाला स्वतःच्या इच्छेविरुद्ध गोठ्यांत कुणातरी धन्यानें दाव्याला बांधलेल्या गुरासारखी कुणातरी पुरुषाच्या आयुष्याशीं सांगड जोडून जीवन जगण्याची पाळी येणें ही तरी जिवंतपणीं एक शिक्षाच नाहीं तर काय ? "

" आणि असल्या शिक्षेला सुखी जीवन समजून जगायचें याला म्हणतात संसार ! " दया म्हणाली.

" होय ! आणि ही शिक्षा आम्ही बायका निमूटपणें भोगायला तयार झालों तरी देखील आमच्यावर संसारापुरतासुद्धां विश्वास टाकायची तयारी नसते तुम्हां पुरुषांची डॉक्टर !... "

बोलतां बोलतां शकुंतलाला अगदीं भडभडून आलें. पुढें तिच्यानें

बोलवेना. दोन्ही हातांत कपाळ घट्ट धरून सुन्न झाल्यासारखी ती गप्प बसली.

अंमळशानें ती पुन्हां बोलूं लागली, " जयंतांच्या अंगीं थोडी तरी खरी माणुसकी जागी असती, तर माझ्या बाळाचा तोंडवळा सोपानासारखा दिसतो, असल्या कल्पनेच्या सुतानें त्यांनीं स्वर्ग गांठला नसता, आणि मला बळेंच व्यभिचारी आरोपाच्या नर्कांत लोटलें नसतें. "

"जयंतांची ती खरोखरच अक्षम्य चूक झाली. मीं त्यांना तेव्हांच–तुम्ही घर सोडून गेलां आणि ते मला भेटले तेव्हां सांगितलें, आणि बराच विचार केल्यावर त्यांना तें पटलेंही. "

" प्रत्येक माणूस आजचा शहाणा आणि कालचा मूर्ख असतो. " दया म्हणाली.

" कशासाठीं मला तुम्ही हें सांगत आहां डॉक्टर? कशासाठीं कोळसा उगाळीत बसायचा हा आपण?" शकुंतलानें विचारलें.

तें ऐकलें न ऐकलेंसें करून डॉक्टर 'थांबा' असें आश्वासून सांगत आंत गेले.

## २

" तुम्ही छत्रपूरच्या टापूंत खेडोपाडीं हिंडून खेडुतांत जागृतीचें कार्य करतां असें आम्हांला ओझरतें कळलें होतें. जयंतच बोलले होते. " दया म्हणाली.

" मग? त्यांना तें आवडलें नसेल! नाहींच आवडणार त्यांना तें. कारण त्यामुळें त्यांच्या प्रतिष्ठेला धक्का लागतोसें त्यांना वाटत असेल. "

" तसेंच केवळ नाहीं. पण जिथें तुम्हांला सोनें वेंचतां आलें असतें, तिथें तुम्ही गोंवऱ्या वेंचीत बसलां आहां असें मात्र त्यांना वाटलें. "

"त्यांना तसें वाटणें अगदीं साहजिक होतें. "

" कां? त्यांचे वडील उद्धवराव जोशी छत्रपूरचे दिवाण आहेत म्हणून?"

"अर्थात्! बाकी, ही देखील एक नवल करण्याजोगीच गोष्ट नाहीं का ग? मुलगा कट्टा कॉंग्रेसभक्त, तर बाप एका काळचा कॉंग्रेसभक्त पण आतां हिंदुमहासभेचा हिरीरीनें कैवार घेणारा आणि कॉंग्रेसचा तिरस्कार

करणारा. कॉंग्रेस आणि हिंदुमहासभा यांच्यांत विळयाभोंपळयाइतकें सख्य आहे म्हणतात; मग ह्या बापलेकांचें कसें पटतें ? ”

“ ही परस्परविरोधाची समस्या पुरी करा ना ! मुलगा कॉंग्रेसभक्त, बाप हिंदुमहासभावादी, आई गांधीवादी — ”

“ कशाला उगीच त्या माउलीला आपण ओढावें या दुष्ट चक्रांत ? ती बिचारी गरीब गाय आहे. काय अस्तित्व आहे तिला यांच्या ह्या एवढ्या गडगंज संसारांत, मला सांग बरें !... ”

तोंच आंतून डॉक्टर एक पत्र घेऊन बाहेर आले.

“ हें पाहा. नुसता माझ्या सांगण्याबोलण्यावर विश्वास नका ठेवूं. हें जयंतांनीं तेव्हां मला पाठविलेलें पत्र वाचून पाहा, म्हणजे तुमच्या मनांतील साऱ्या शंका दूर होतील.” असें म्हणून डॉक्टरांनीं तें पत्र शकुंतलापुढें केलें.

“ हें पत्र मीं वाचावें अशी तुमची इच्छा आहे डॉक्टर ? ” शकुंतलानें पत्र हातीं घेतां घेतां विचारलें. तिला मनापासून आतां पुन्हां कोणत्याच नव्या अनोळखी खोल पाण्यांत उतरायचें नव्हतें. पण केवळ डॉक्टरांची भीड राखण्यासाठीं ती स्वतःच्या मनाविरुद्ध शिष्टाचार सांभाळून वागत होती.

“ तुम्ही तें वाचून पाहा. म्हणजे तुम्हांला अवश्य तो उलगडा होईल.” डॉक्टर म्हणाले.

“ मला अवश्य तो सारा उलगडा अगोदरच—अगदीं आरंभींच झाला आहे डॉक्टर ! नाइलाजानें उघड्या डोळ्यांनीं मला ह्या संसाराच्या पेटत्या निखाऱ्यांच्या खाईतून आयुष्यभरचा प्रवास पत्करावा लागला, त्यापूर्वीच सारा उलगडा मला झाला आहे. आतां पुन्हां तो कोळसा उगाळून हात काळे करून कशाला घेऊं मी ? ” असें उद्गारत शकुंतलानें तें पत्र उघडून न पाहतांच बाजूला ठेवलें.

“ माणूस आयुष्यांत कधीं चुकत नाहीं का शकुंतलाबाई ? आणि चुकली चूक सुधारून माणसाला आयुष्यांत वागतां येत नाहीं का पुन्हां ? ” डॉक्टर तें पत्र हातीं घेऊन हिरमुसल्या वृत्तीनें म्हणाले.

वाढत्या गंभीर वृत्तीनें शकुंतला कळवळून उद्गारली, “ नका. डॉक्टर ! हीं पूर्वींच्या आठवणींचीं मढीं उकरून खांद्यावर घेऊन मला नाचायला लावूं नका. तुम्ही हें मित्रकार्य करीत आहां, मी जाणतें. पण यांतून

कांहींही चांगलें निर्माण होणार नाहीं. " ती आगीच्या पेटत्या खाईपासून दूर दूर जात असल्यासारखी स्वतःचें थरारतें अंग सांवरीत म्हणाली, " माझ्या संसारी जीवनाची अशी मरणोत्तरदेखील चीरफाड झालेली मला पाहायला नको, म्हणूनच मीं आजवर इतके दिवस स्वतःला परागंदा करून घेतलें होतें. आणि आजही जी मी इकडे आल्यें, प्रकट झाल्यें, ती त्या खातेऱ्यांत लोळत पडण्यासाठीं मुळींच आलेली नाहीं. मला तें नको आहे. आणि तुम्ही ऋणानुबंधाचीं माणसेंही जर नको असलेल्या गोष्टी मला बळजबरीनें ऐकायला किंवा करायला लावणार असाल, तर—मला मग याच पावलीं जाऊं द्या ना आल्या वाटेनें ! "

नुसतें ' मला जाऊंद्या ' असें ती बोलली असें नव्हे. ती त्या अपरात्रीं निघून जाण्याच्या तयारीनें हालचाल करूं लागली.

डॉक्टरांनीं तें ओळखलें. दयानेंही ओळखलें. आपण हा विषय काढण्यांत चूक केली असें डॉक्टरांना आतां वाटूं लागलें. त्यांचें मन खट्टावल्यासारखें झालें.

तेवढ्यांत इस्पितळांतून त्यांचा सहकारी डॉक्टर एक रोगी अत्यवस्थ आजारी असल्याची वार्ता घेऊन आला.

डॉक्टरांना तो जणूं देवदूत आल्यासारखा वाटला. त्या निमित्तानें त्यांनीं घाईघाईनें सौम्य, आपुलकीच्या शब्दांत शकुंतलाचा निरोप घेतला.

डॉक्टर इस्पितळाकडे गेले. तेव्हां कुठें शकुंतलाला जरा हायसें वाटलें. दयालाही अंमळ विरंगुळा वाटला. तो विषय तिलाही तापदायक वाटत होता. पण त्याचीं कारणें तिचीं निराळीं होतीं व शकुंतलाचीं निराळीं होतीं.

बराच वेळपावेतों त्या दोघी एकमेकींशीं कांहीं बोलल्या नाहींत. बिछान्यावर पडून होत्या. झोंप लागावी म्हणून दयानें त्या खोलींतील शय्यादीप तेवढा मिणमिण तेवत ठेवून बाकीचे दिवे मालवले. पण दिव्यांना झोंपीं घालवूनही तिला झोंप कांहीं केल्या येईना. आणि शकुंतलालाही झोंप येईना.

" झोंप लागली का ? " बिछान्यावर गाढ झोंपीं गेलेल्या अशोकाच्या अंगावरची दुलई नीट करीत दयानें शकुंतलाला अनुलक्षून प्रश्न केला.

" नाहीं. झोंप लागली नाहीं. " शकुंतला कुशीला वळून दयाच्या बिछान्याकडे तोंड करीत म्हणाली.

" मस्तकांत विचारांचें काहूर उसळलें असेल नाहीं तुमच्या ? दादांनीं अशी जखमेवरची खपली काढायला नको होती. बाकी, ते जें बोलले, ते चांगल्या हेतूनें बोलले. आपल्या मित्राचा मोडलेला संसार पुन्हां नीट जोडला जावा या सद्भावनेनें ते बोलले. "

" डॉक्टरांना समुद्राचा पृष्ठभाग तेवढा दिसतो. पण समुद्राच्या तळाशीं रात्रंदिवस चालू असलेला जलचरांचा तुंबळ संग्राम दिसत नाहीं. " शकुंतला म्हणाली.

" तो त्यांना कसा दिसेल ? तो संग्राम ज्याच्या त्याच्या जीवनापुरता ज्याला त्याला दिसायचा. पण शकुंतलाबाई ! मी एक विचारूं का ? "

" विचारा ना ! "

" राग नाहीं ना येणार ? "

" हा प्रश्न तुम्हीं मला विचारावा दयाबाई ? व्यवहाराच्या कांटेरी कुंपणावर वाळत घातल्यासारखें आपणां दोघींचेंही जीवन आहे खरें—"

ते बोल बोलतांनाची दयाची कारुण्यमुद्रा जरी शय्यादीपाच्या अंधुक प्रकाशांत शकुंतलाला दिसली नाहीं, तरी दयानें एक उसासा सोडून तिच्या जीवनविषयक विधानाला दिलेली मुकी प्रतिसाद तिच्या ध्यानीं आली.

" पण आपण दोघींनींही एकेमकींच्या जीवनाची कधीं कांटेऱ्यांवरून निर्दय ओढाताण केली नाहीं. निदान तुम्हीं तरी माझ्या जीवनाची तशी मुळींच ओढाताण केली नाहीं. आतां, माझ्या पायांनीं मींच जिथें सतीचें व्राण पत्करावें तसा अग्निप्रवेश समजून उमजून केला, तिथें त्याला तुमचा तरी काय इलाज ? "

त्यावरही दया कांहीं बोलेना.

तेवढ्यांत ' आई ' ' आई ' अशा हांका मारीत अशोक झोंपेंत जाबडूं लागला. शकुंतलानें त्या हांका ऐकल्या. क्षणभर तिला वाटलेंही, कीं ' ओ ' म्हणावें; बालकाला थोपटून समजावावें. पण तिनें मनांतील पूर्वसंकल्प आठवून आपलें मायाळू मन आवरलें.

पण बाळाच्या झोंपेंतील जाबडत्या हांकेला मातेच्या पांखरमायेच्या

ओढीनें धांवून न गेल्याबद्दल तिला क्षणभरही अपेक्षित विषाद मानण्याची पाळी आली नाहीं. तिच्या ठायीं दया त्या लेंकराला सांभाळायला होती. तिनें त्याला थोपटलें.

" बाळ ! माझा बाळ !–असा टाहो फोडीत बिचाऱ्याची आजी देवाघरीं निघून गेली. " अशोकाला थोपटतां थोपटतां दयाच्या मुखांतून उद्गार निघाले. " आणि तुमच्यासाठीं तर– " एवढें वाक्य अर्धवटच बोलून तिनें एक उसासा सोडला.

" माझी आई मला अंतरवैरीण म्हणाली असेल मनांतून, नाहीं ? पण दयाबाई ! माझाही कांहीं इलाज नव्हता त्याला. आईबापांच्या मायेच्या मोहांत गुरफटून मी जर सासर सोडून माहेरीं येऊन राहिल्यें असत्यें, तर त्यांच्या अपत्यवत्सलतेमुळें त्यांच्या गळयाला फांस लागल्यासारखा झाला असता माझ्या जिवंतपणाचा ! नाहीं ? असें पाहा दयाबाई ! स्त्रीचा जन्म सर्वस्वीं परप्रकाशी, नाहीं का हो ? त्यांतल्या त्यांत विवाहित स्त्रीचा जन्म तर अगदींच परप्रकाशी. परावलंबी. पतीनें सहानुभूतीचा कटाक्ष फेंकून प्रकाश पाडला तर स्त्रीजीवन तेवढ्यापुरतें उजळलेलें दिसायचें. पुरुषाचें मन कोणत्याही कारणानें विटलें कीं स्त्रीच्या जीवनांत अंधारीअंधार झाला. मलाही आठवण झाली कीं फार वाईट वाटतें. माझ्या आईची मी एकुलती एक लाडकी लेक असतांना तिच्याआयुष्याच्या अखेरच्या क्षणाला मी तिला अंतरल्यें. पण पुन्हां मनाला असें वाटतें, कीं आपल्या पतीच्या अविश्वासाला पात्र झालेली लेक तिच्याजवळ असल्यानें तिचा समाजांत उगीचच दुर्लौकिक झाला नसता का ? "

" योगायोगच म्हणायचा तो ! दुसरें काय ? पण आतां तरी ती विस्कटलेली घडी आपणाला नीट बसवतां यायची नाहीं का हो शकुंतलाबाई ? विझलेला दिवा पुन्हां पाजळून आपणाला अंधारानें ग्रासून टाकलेलें आपल्या सभोंवारचें जीवन प्रकाशमान करतां येणार नाहीं का ? "

दयाच्या प्रश्नावर कांहीं क्षण विचार करून शकुंतला म्हणाली, " जीवन ? येईल. प्रकाशमान करतां येईल. "

" जयंतांचा जीवही तापल्या वाळूंत पडलेल्या मासळीसारखा तडफडतांना पाहून मला फार फार वाईट वाटतें. वाटतें, काय केलें मीं म्हणजे

सर्वांचें जीवन सुखाचें होईल? ते, तुम्ही, मी, आपला हा अशोक, या साऱ्यांचें जीवन सुखाचें होईल असा उपाय कोणी आपणाला सुचवील का हो? आपणाला तरी असा उपाय शोधून काढतां येईल का?"

"तसा उपाय आपण काढूं शोधून. उपाय शोधून काढला पाहिजे खरा. या कामांत तुम्ही मला मदत कराल?"

"हो! करीन. अवश्य सांगाल तें करीन मी. पण या दुष्ट चक्राचा भेद करून यांतून सर्वांना बाहेर काढल्याखेरीज तुम्ही जर मला सोडून जाल–"

"...तर माझ्या गळ्याची शपथ! अशोकच्या गळ्याची शपथ!" असें कांहीं तरी आव्हानपूर्वक शब्द बोलण्यासाठीं तिच्या अगदीं ओंठावर आले होते. पण ते तिनें बळेंच आवरले, व आपलें आपणाला सांवरून घेतलें.

"नाहीं ना जाणार तुम्ही मला अशी अंधारांत चांचपडत टाकून शकुंतलाबाई?"

"तुम्हांला अंधारांत टाकलें आहे? आणि मीं?"

"नाहीं. तुम्हीं नाहीं मला अंधारांत टाकलें. पण मी अंधारांत सांपडल्यें आहें एवढें मात्र खरें. हा अंधार कसा दूर होणार आहे कोण जाणे!"

"होईल! होईल! दयाबाई, तो अंधार दूर होईल. अंधारी रात्र संपते आणि प्रकाशानें दिशा उजळतात. दिवस उजाडतो—"

तोंच बंगल्याबाहेर कुणाची तरी जाग मिळाली. त्यासरशीं शकुंतला दचकून वर मान करून पाहूं लागली.

बाहेरून खोलीच्या दारावर टिक् टिक् टिक् असा आवाज झालेला ऐकून दयानें बिछान्यावरून उठतां उठतां विचारलें, "कोण आहे?"

"सिस्टर?" बाहेरून हांक आली.

दयानें खोलींतील विजेच्या दिव्याचें बटण दाबून प्रकाश केला. दरवाजा उघडतां उघडतां विचारलें, "काय काम आहे?"

इस्पितळाचा शिपाई म्हणाला, "डॉक्टरांनीं तुम्हांला ताबडतोब बोलावलें आहे. आतांच्या आतां एक ऑपरेशन करायचें आहे."

# ३

कर्तव्याची हांक कानीं येतांच दया तशीच तांतडीनें कपडे बदलून इस्पि-तळाकडे निघाली. दरवाजापावेतों जाते न जाते तोंच पुन्हां मागें वळून बिछान्यापाशीं आली, व अशोकबाळाच्या अंगावरील पांघरूण नीट सांवरल्यासारखें करीत शकुंतलाला अनुलक्षून पण स्वतःशीं उद्गारली, "गुलाम लोळेल बिळेल झोंपेंत आणि पडेल खालीं. जरा लक्ष ठेवायला हवें."

शकुंतलाला तें ऐकून हंसू आलें. कुतूहलही वाटलें. मुलगा कुणाचा आणि काळजी करते कोण !

कांहीं मिनिटें खोलींतील विजेचा दिवा तसाच ढण ढण जळत होता.

त्या दिव्याच्या प्रकाशाइतक्या उज्ज्वल प्रकाशानें शकुंतलाचें अंतरंगही प्रकाशित झालें होतें. तेंदेखील नुसतें भणभणत्या प्रकाशानें प्रकाशित झालेलें नव्हे. प्राण्यांना व वनस्पतींना—साऱ्या सजीव सृष्टींत वसंतकाळाचें नवचैतन्य ओतणाऱ्या सूर्यप्रकाशासारखा तो प्रकाश तिला चैतन्य-दायक वाटला.

"माझ्या बाळाच्या काळजींतून मी आतां तरी सुटेन. मग जगांत मला कोण अडवणारें आहे ? दाही दिशा मला मोकळ्या आहेत. माझ्या रंजल्यागांजल्या गरीबगुरीब कोट्यवधि देशबांधवांच्या सेवेंत आयुष्य सत्कारणीं लावायचें म्हटलें, तर पुन्हां जन्म घेऊन पुन्हां राबल्यें तरी देखील आयुष्य अपुरें पडेल—"

तिनें विचार करतां करतां आपली हातपिशवी जवळच लोखंडी खुंटीला टांगलेली होती ती काढून घेतली. तिच्यांतली दैनंदिनीची वही काढली. रोज रात्रौ झोंपीं जाण्यापूर्वी दैनंदिनी लिहिण्याचा तिचा बऱ्याच काळा-पासूनचा परिपाठ होता.

शकुंतलाच्या दैनंदिनीचा विशेष—त्यांतल्या त्यांत तिनें रामगड कॉंग्रेस-मधील गांधींचा सत्याग्रही उपदेश ऐकल्यापासूनचा विशेष हा कीं गांधीजींच्या उपदेशाप्रमाणें ती साऱ्या दिवसांत केलेल्या कार्याचें अगदीं

विश्वासानें सत्यकथन तर करीच. पण तें सत्यकथन केवळ घडलेल्या गोष्टींचेंच नसे. विविध मनोव्यापारांचें सत्यान्वेषणही त्यांत असे. त्या सत्यान्वेषणांत अनेकदां तिला कठोर आत्मपरीक्षण करावें लागे. आपल्या चुकांचा पाढा अनेकदां वाचावा लागे. त्यामुळें पुष्कळदां अपराध्याच्या कबुलीजबाबासारखें आत्मशासनाच्या स्वरूपाचें तें सत्यकथन कधीं कधीं अतिशय मर्मभेदी व दाहकही असे. कधीं ती मनांत आलें तर आपल्या रोजनिशीचीं मागील पृष्ठें मधून मधून चाळून पाही.

आणि तेव्हां स्वतःशीं हंसून उद्गारे, "आगीच्या घडधडत्या ज्वाळांतून पंख फडकवीत बाहेर पडलेल्या आगकिडीसारखीच आहे कीं मी! ह्या आगींत मी अजून जळून भाजून भस्मसात् होऊन कशी गेल्यें नाहीं याचेंच मला मोठें नवल वाटतें."

आजची दैनंदिनी लिहिण्यासाठीं तिनें वही उघडली. तिच्यांत आजचें प्रतिवृत्त लिहिण्यासाठीं तिनें आपली 'पारकर' झरणी काढली. पण पाहते तों तिच्यांतली शाई संपलेली.

"आजकालच्या माझ्या गरिबीच्या राहणीला ही भारी किंमतीची झरणी शोभत नाहीं. आतां हिचाही निरोप घ्यायला हवा मला." असें म्हणत तिनें ती झरणी बाजूला ठेवून दिली. आणि दयाची झरणी अथवा झरणीच्या शाईची दौत मिळाली तर पाहावी, म्हणून तिनें टेबलाचा खण उघडला.

तों नोटपेपरवर लिहिलेलें पत्र तसेंच उघडेंच टेबलाच्या खणांत तिला आढळलें.

कुणाचींही पत्रें चोरून वाचण्याची संवय शकुंतलाला मुळींच नव्हती. पण टेबलाचा खण उघडतांच तें लिहिलेलें पत्र तिला आढळलें. त्या पत्राच्या आरंभींच्या ओळींवर अगदीं स्वाभाविकपणें तिची नजर गेली. मनांतून विशेष इच्छा नसतांही स्वाभाविक अकारण जिज्ञासेच्या आहारीं जाऊन तिनें त्या पत्राच्या आरंभींचा मायना वाचला, "प्रिय जयंत!..."

तिनें मायना वाचला मात्र, आणि सर्वांगांतून विजेचा हादरा सळसळत जावा तसें तिला होऊन गेलें.

दुसऱ्याचें पत्र चोरून वाचूं नये ह्या नीतिशास्त्राची मनांत चांगली

आठवण असूनही तिला तें पत्र वाचून पाहण्याचा मोह आवरला नाहीं. मात्र त्या मोहांतही सद्भाव होता. दया व जयंत यांच्याविषयीं कांहीं विशेष अपेक्षा बऱ्याच दिवसांपासून—किंबहुना अशोकच्या खेपेला बाळंतपणांत दयाची व तिची नर्स म्हणून ओळख पडण्यापूर्वीच थोडे दिवस अगोदरपासून तिनें आपल्या मनींमानसीं जोपासल्या होत्या. त्या फलद्रूप होण्याची ती मनापासून किती तरी दिवस वाट पाहत होती. त्या अपेक्षांच्या यशस्वितेचा कांहीं मागोवा ह्या पत्रांत सांपडेल अशा आशेनें ती तें पत्र घेऊन वाचूं लागली.

प्रिय जयंत !

आपलें पत्र पोंचलें. आपणांविषयीं मला वाटणारा आदर अभंग आहे, हें अगोदर आश्वासनपूर्वक सांगत्यें. आणि नंतर मला कांहींशा कडू शब्दांत आपणाला सांगायचें आहे, कीं आपल्या अंतःकरणांतील भावनांचें गंगाजल मनोविकारांच्या क्षणिक वरचढपणामुळें का असेना पण गढूळ झालेलें मला दिसतें आहे.

आपल्या पत्रांतील प्रश्न असे खट्याळ व गुंतागुंतीचे आहेत कीं त्यांचीं उत्तरें देणें माझ्यासारख्या साध्याभोळ्या स्वभावाच्या व्यक्तीला महाकर्म कठीण आहे. पत्र वाचतांना मला असा भास झाला कीं हे माझ्याशीं जयंत बोलत नसून तर्ककठोर शब्दसृष्टीची घटोत्कचाची देखतभुली माया निर्माण करणारा व त्या मायाजालांत प्रतिपक्षाला गुरफटवून आपल्या यशोमंदिराच्या प्रांगणांत रावण्यासाठीं आकर्षून नेणारा निष्णात वकील बोलतो आहे.

मला साध्यासुध्या सरळ वृत्तीच्या जयंतांशीं बोलणें आवडतें. वकिलाशीं बोलणें आवडत नाहीं.

यासाठीं यापुढें तरी आपल्या ठायींच्या वकिलानें माझ्यापासून चार पावलें दूर राहावें.

आपला पहिला प्रश्नः 'मला तूं आयुष्यांत सुखी झालेला पाहूं इच्छितेस कीं नाहीं ? मला सुखी करूं इच्छितेस कीं नाहीं ?'

मला वाटतें, आपण हा प्रश्न मला विचारायलाच नको होता. परंतु ज्या अर्थीं आपण मला तो विचारला, त्याअर्थीं सुखाच्या आपल्या व

माझ्या कल्पनेंत कांहीं अंतर असल्याचें आपणाला प्रतीत होत असावें.

आपला दुसरा प्रश्न : 'तूं आरंभापासून सांगत आलीस, कीं तुमच्या सुखांत माझें सुख सामावलेलें आहे. हें जर खरें असेल, तर आपणां उभयतांच्या सुखाचीं क्षितिजें भिन्न भिन्न असूं शकतात का ?'

नसतात. मी निःसंकोचपणानें सांगत्यें आपणाला जयंत ! पण त्याबरोबरच आपण हें ध्यानीं घेतलें पाहिजे, कीं क्षितिजें दोन असतात. एक खरें आणि एक दिसणारें.

आणि इथेंच तर माणसाची फसगत होते. आपणाला जर आपल्या व माझ्या जीवनाच्या आकाशाला आधारून धरणारें खरें क्षितिज पाहतां आलें तर तें एकच आहे असें दिसून येईल. परंतु वासनांचे खेळ खेळतां खेळतां अथवा वासनांच्या हातांतील खेळणें बनून आपण आकाशाकडे दृष्टिक्षेप केला, म्हणजे जें क्षितिज आपणाला दिसतें, तें खरें क्षितिजसें आपणाला वाटतें. आपला आग्रह आहे, कीं तेंच देखत-भुलें क्षितिज आंधळयाप्रमाणें मीं खरें मानावें.

पण तसें जर मीं केलें, तर मीं तो मला स्वतःला, आपणाला, शकुंतला—अशोक जे जे कोणी निकटवर्ती संबंधी असतील त्यांना अक्षम्य अन्याय केल्यासारखें होईल. शकुंतलाच्या वैवाहिक जीवनाची होळी पेटत आहे. ती होळी आपण हेतुपुरःसर पेटवीत नसाल. पण ती कळून वा न कळून आपल्या हातून पेटली आहे. त्या होळीवर मीं माझी पोळी भाजून घ्यावी, असें का आपणाला म्हणायचें आहे ?

त्यापेक्षां माझी आपणाला पुन्हां पुन्हां हात जोडून विनंति आहे, कीं आपण मला थोडी सवड द्या. मी शकुंतलाला शोधून काढीन. ती माझी मैत्रीण आहे. तिचीं सुखदुःखें मला ऐकूं द्या. माझीं सुखदुःखें तिच्याजवळ मनमोकळेपणानें बोलूं द्या. आपणां दोघांच्या आयुष्यांत एकमेकांची वृथा अडवणूक व गांजणूक करणारी जी ब्रह्मगांठींसारखी गुंतागुंत निर्माण झाली आहे, त्या ब्रह्मगांठी जर मला सोडवतां आल्या तर सोडवून पाहूं द्या.

जयंत ! सुख सुख आपण म्हणतों. पण सुख स्वतः भोगण्यांत नाहीं, तर दुसऱ्याला सुख भोगूं देण्यांत आपलें खरें सुख असतें असें मला

वाटतें. मी तरी शकुंतलाला पुन्हां आपल्या संसारांत सुखी झालेली पाहून जितकी सुखी होईन, तितकी—नव्हे, मुळींच—तिचें हक्काचें स्थान हिरावून घेऊन आपली सहचारिणी होण्यानें सुखी होणार नाहीं.

आणि आतां तूर्त आपण एक करूं. तो आपला दोष नाहीं. पण आपण आज अशा विचित्र मनःस्थितींत आहां कीं अशा वेळीं आपल्या अत्यंत प्रिय मैत्रिणीचा सहवास आपल्या आणि त्या मैत्रिणीच्याही अधःपाताला कारण होणें फार संभवनीय आहे.

यासाठीं मला एकंदर परिस्थितीचा जरा शांत चित्तानें विचार करूं द्या. शकुंतलाला हुडकून काढून भेटूं द्या. तिच्या मनाचा तळठाव पाहूं द्या. तिला सुखी पाहूं द्या आणि मला सुखी होऊं द्या.

तोंपावेतों आपणाला मी भेटणार नाहीं; आपण मला भेटूं नये. आपणाला मी पत्र पाठविणार नाहीं; आपण मला पत्र पाठवूं नये. आपण पत्र पाठविलें तरी मजकडून माझें मन पूर्ण विचाराअंतीं निश्चित निर्णयाला येईतों निर्णयात्मक उत्तराची अपेक्षा करूं नये.

जयंत ! आपल्या एकुलत्या एका लेंकराच्या कपाळींचा वनवास टळावा असें आपणाला वाटतें, ही चांगली गोष्ट आहे. पण त्या लेंकराचा वनवास टाळण्यासाठीं आपण त्याच्या आईला वनवासी होऊं देणें, हा भारतमातेला वनवासी करणाऱ्या इंग्रजांच्या कुटिल राजनीतीला शोभणारा कुटिल डाव आहे. आपण आतां असे असतां उपयोगी नाहीं.

हिंदु पति म्हटला, कीं त्यानें माणुसकीला पारखें असलेंच पाहिजे असा दंडक आहे का ?

मला अशी दृढ आशा आहे जयंत ! कीं आपण तुरुंगांतून सुटून याल, ते हीं सर्व विकल्पांचीं जळमटें झटकून झाडून, भट्टींतून तावून सुलाखून निघालेले, शंभर नंबरी शुद्ध सोनें बनून याल; आणि मलाही माझ्या आयुष्याचें तसेंच शुद्ध सोनें करायला जिव्हाळ्यानें हातभार लावाल...

# ४

पत्र अपुरेंच लिहिलेलें होतें. शकुंतलानें त्यावरची तारीख पाहिली तों तें पूर्वदिवशीं लिहिलेलें होतें.

'धन्य आहे तुझी दया! तूं मूर्तिमंत दया आहेस. बस्स! आपण दोघीही सुखी होऊं आणि सर्वांना सुखी करूं. तूं सुखी, जयंत सुखी, मी सुखी, अशोक सुखी, सारीं–सारीं आपण सुखी होऊं. मी सर्वांना सुखी करीन आणि मीही सुखी होईन.' असें मनांत म्हणतां म्हणतां शकुंतलानें तें पत्र पुन्हां जागच्या जागीं ठेवलें, व टेबलाच्या खणांतील झरणीची शाई झरणींत भरून घेऊन आपली दैनंदिनी लिहायला घेतली.

शकुंतलाची दैनंदिनी लिहून झाली. तिनें घड्याळाकडे पाहिलें. बारा वाजण्याचा सुमार होता.

तिनें दयाच्या बिछान्याकडे पाहिलें. अशोक अगदीं शांतपणें झोंपीं गेला होता.

सभेंत कपाळाला झालेल्या जखमेच्या वेदना आतां पूर्णपणें थांबल्या होत्या.

'दया केव्हांशी येईल? तिला मीं भेटावें का? कीं भेटल्यानें पुन्हां नवे गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न होतील? इतक्या सायासांनीं हातांपायांतील बेड्या तोडून मोकळीक करून घेण्याची आलेली सोन्याची संधि मीं दवडतां कामा नये...'

मस्तकांत असें विचारांचें चक्र वेगानें गरगर फिरत होतें. तशाच स्थितींत शकुंतलानें खोलींतील दिवा विझविला व बिछान्यावर थोडा वेळ विश्रांति घेतली.

पण विश्रांति कसली ती? संकल्पित मार्गानें सर्व बंधनें तोडून नव्या जीवनयात्रेला निघण्यासाठीं उतावळें झालेलें मन तिला स्वस्थ बसूं देईना.

ती पुन्हां उठली. खोलींत विजेच्या दिव्याचें बटण दाबून तिनें प्रकाश केला. तिचें मन तिला पुन्हां पुन्हां आग्रहानें सांगत होतें, "ऊठ! वेळ काय दवडतेस वेडीसारखी? बाहेर तुझ्या देशाचा मूर्तिमंत

दरिद्रीनारायण आशेनें तुझ्यापुढें भिकेसाठीं हात पसरून तिष्ठत उभा आहे. तो तुझा समाज; हा नव्हे ! तूं वाट चुकून भलतीकडे आली आहेस. ही आडवाट सोडून वाटेला लागण्याची सोन्याची संधि आली असतांना ती तूं वायां दवडणार ? स्वतःशीं देखील प्रतारणा करणार ? ऊठ ! ”

डोळ्यांवरचे निद्रापाश जोरानें झटकून बाजूला सारीत ती उठली. टेबला-वर एक पत्र लिहून ठेवलें.

पत्र लिहून पुरें झालें आणि भिंतीवरच्या घड्याळांत साडेबारांचा टोला पडला.

तिनें तें पत्र दयाच्या टेबलाच्या खणांत ठेवून दिलें. आंत जाऊन आपलें मळकट पातळ नेसली. नेसलेलें दयाचें पातळ तिथेंच बाजूला टेवून दिलें.

ह्या साऱ्या हालचाली सुरू असतांना तिची नजर मधून मधून एक-सारखी दयाच्या बिछान्यावर झोंपीं गेलेल्या बालकावर मायेची पाखरछाया धरीत भिरभिरत होती.

सारी आवराआवर झाली. आवराआवर ती काय व्हायची ? आवरा-यला होतें काय ? विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर.

तरी पण वस्तूंच्या आवराआवरीपेक्षां मनाची आवराआवर मोठी खड-तर होती. ती करतां करतां शकुंतला पुरी गोंधळून गेली होती. पुन्हां पुन्हां ती आपल्या कपाळाची मलमपट्टी बांधलेली जखम हातांनीं चांचपून पाही आणि पुन्हां पुन्हां समोर दयाच्या बिछान्यावर झोंपी गेलेल्या लेंकराला न्याहाळी.

असें होतां होतां घड्याळांत एकाचा टोला पडला.

“ आतां वेळ दवडतां उपयोगी नाहीं. दया येईल, डॉक्टर येतील, आणि मग मला पुन्हां नको असलेल्या जंजाळांत गुरफटून पडावें लागेल.” असें स्वतःशीं उद्गारत ती प्रयाणाच्या निर्धारासरशीं बिछान्यावरून उठली.

तिच्या मनांत आलें, एकवार—फक्त एकवार आपण आपल्या बाळाचें मुख अवलोकन करावें, त्याचें आई या नात्यानें अखेरचें चुंबन घ्यावें, आणि आपल्या मार्गाला लागावें.

तोंच अशोक चाळवल्यासारखें करून हांका मारूं लागला, " आई ! आई !... "

बाळ जागा झाला तर अपत्यवत्सलतेची सोन्याची बेडी पुन्हां आपल्या हातींपायीं पडेल आणि पुन्हां आपण मायामोहाच्या बंधनांत जखडून जाऊं, या भीतीनें शकुंतलानें दिवा लावला नाहीं. तशीच ती अगदीं हळुवार पावलांनीं अशोकच्या बिछान्यापाशीं गेली.

" आई ! आई ! " अशोकनें झोंपेंतच आपल्या बाळस्वभावानुसार हांका मारल्या.

" ओ ! मी ही इथें आहें ना बाळ ! झोंप बरें ! इथें आहें मी. " असें त्याला समजावीत आईनें लेंकराचा पापा घेतला.

झोंपेंतच अशोकनें आईच्या गळ्याला आपल्या बाळहातांचा विळखा घातला.

किती कोमल, पण किती बळकट विळखा होता तो ! तो सोडवून आपली सुटका करून घेतांना शकुंतलाला इतके प्रयास पडले कीं आयुष्यांत स्वतःच्या जीवाची असली दारुण ओढाताण ती आज प्रथमच अनुभवीत होती.

अखेर तोही विळखा तिनें अगदीं हलक्याफुल हातानें मोकळा केला.

आणि आतां बाहेर जाणार...

तोंच दया आणि डॉक्टर बोलत येतांना त्यांचे शब्द शकुंतलाच्या ओझरते कानीं पडूं लागले.

" आपल्या जिवावर उठलेला तो वेडा सोपाना वाघमारे आहे हें शकुंतलाला माहीत तरी आहे ? "

" काय सांगावें ? ती कांहीं माझ्यापाशीं तसें बोलली नाहीं. " दया उत्तरली.

" तो वेडा सोपाना आहे ! सोपाना तो ! " शकुंतला ते शब्द कानीं पडतांच एकदम दचकून आंथरुणावर उठून बसली.

" सोपाना ! सोपाना ! कुठें आहेस रे तूं ? " तिनें अंतःकरणांतल्या अंतःकरणांत टाहो फोडला.

" तरी मला तेव्हां तसें वाटलेंच. " तिनें मनाला सांगितलें.

तो सभास्थानीं उडालेल्या गोंधळाचा–तिच्यावर हल्ला करणाऱ्या माथे-फिरूला मारीत झोडीत लाथाबुक्यांनीं तुडवीत लोकांनीं हाकलीत नेल्याचें दयाच्या तोंडून ऐकायला मिळालें होतें त्याचा–चित्रपट तिच्या मनःसृष्टींत डोळ्यांपुढें झरझर सरकूं लागला.

" सोपाना ! सोपाना ! तूं मला कुठें रे भेटशील ? कुठें असशील तूं ? " असे कळवळते उद्गार स्वतःशीं काढीत शकुंतला मनाचा निर्वाणींचा निर्धार करून उठली. दया तिथें येऊन पोहोंचण्यापूर्वींच काळोखांतच आपले कपडे, कागद वगैरे सामान घाईघाईनें पिशवींत भरून ती खोलीबाहेर पडली.

दरवाजाबाहेर पाऊल टाकतां टाकतां तिचा जीव पुन्हां एकवार अशोकचा अखेरचा पापा घेण्यासाठीं घुटमळूं लागला. पण आतां इथून पुढें आपणाला आयुष्यभर जो कठोर संयम राखावा लागणार, त्या संयमाचा पहिला धडा तिनें तोच गिरवला. आपल्या अत्यंत आवडत्या–स्वतःच्या पंचप्राणांहूनही आवडत्या अपत्याचा त्याग करून बाहेर पडतांना स्वतःच्या मनाच्या निष्ठुरतेऐवजीं शूरता व खंबीरताच तिला उत्कटतेनें जाणवत होती.

अंमळशानें दया झोंपण्यासाठीं आपल्या खोलींत आली, ती शकुंतलाची व अशोकची झोंपमोड होईल या भीतीनें दिवादेखील न लावतां बिछान्या-वर झोंपीं गेली.

तिच्या चाहुलीनें झोंपेंतच चाळवल्यासारखा झालेल्या अशोकनें 'आई ! आई !' अशा हांका मारीत तिच्या गळ्याला मिठी मारली, ती तो चांगला गाढ झोंपीं जाईतों कांहीं तिला सोडवतां आली नाहीं.

## ५

उजाडलें.

अशोक जागा झाला. 'आई ! आई !' अशा हांका मारूं लागला. रात्रभर जागरण झालेली दया त्याच्या हांकांनीं जागी झाली.

जाग येतां येतांच तिनें हांक मारली, " शकुंतलाबाई ! उठा ना ! अशोक हांक मारतो आहे. "

पण शकुंतला जाग्यावर कुठें होती ? तिचा बिछाना मोकळा !

टेबलाचा खण मात्र अर्धा उघडा पडला होता.

दयाचें सहज तिकडे लक्ष गेलें. प्रथम शकुंतला तिथें बिछान्यावर नाहीं असें पाहतांच तिला वाटलें, कीं ती उठून बाहेर तोंड धुवायला, सकाळचीं रोजचीं आन्हिकें आटोपायला गेली असेल.

तोंच टेबलाच्या उघड्या खणांत स्वतःचें नांव लिहिलेला लिफाफा तिला आढळला. हस्ताक्षर तिनें ओळखलें. तें शकुंतलाचेंच होतें.

तेव्हां मात्र दयाच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडूं लागला. अंतःकरण धडधडूं लागलें.

' आई ! आई !' अशा हांका मारणाऱ्या अशोकला उचलून कुरवाळीत तिनें तें पत्र उघडून वाचलें.

' प्रिय दया !

मी तुम्हां साऱ्यांचा निरोप घेत्यें आहें. माझ्या आणि तुम्हां सर्वांच्या सुखाचा मार्ग मी चोखाळीत आहें. माझें मलाही बंधन नको, माझें कुणालाही बंधन नको व कुणाचें मला बंधन नको. आपण सर्वच मनःपूत वागायला स्वतंत्र होऊं. अगदीं फुलपांखरांसारखीं स्वतंत्र होऊं. म्हणजेच आपण सुखी होऊं आणि इतरांना सुखी करूं.

मी हें त्राग्यानें लिहीत नाहीं दया ! अगदीं मोकळ्या मनानें व प्रसन्न वृत्तीनें लिहित्यें आहें. मला माहीत आहे, अगदीं आरंभापासून माहीत आहे कीं माझी इच्छा नसतांना, मला कांहीं देखील माहीत नसतांना माझ्यामुळें तुमच्या सुखांत माती कालवली गेली. आणि ज्या हातांनीं तुमच्या सुखांत माती कालविली, त्याच हातांनीं माझ्याही सुखांत माती कालविली. समाजपुरुषाचे हे अक्राळविक्राळ हात आवरून धरायला आपण बायका अगदीं दुबळ्या, अगदीं अगतिक आहों, नाहीं दया ?

मला या वेळीं याबद्दल कुणालाही दोष द्यायचा नाहीं. नांवें ठेवायचीं नाहींत. मी तुम्हांला अगदीं मनमोकळेपणानें एवढेंच स्पष्ट करून सांगतें आहें, कीं संसारी जीवनांत तुम्ही स्वतःला समजतां तशी धोंड

माझ्या मार्गांत मुळींच नाहीं. उलट तुमचें आमच्या सुखासाठीं पेटत्या मेणबत्तीप्रमाणें झिजणारे जीवन हा माझा प्रकाशदीप आहे.

तुम्हांला माहीत आहे दया! कीं आमचा—मी व जयंत या उभयतांचा संसार विजोड आहे. तो विजोड आहे म्हणूनच तो मोडला. ह्या विजोडाचा जोड जमवतां यायचा नाहीं कुणाला. तेव्हां त्या फोल आशा आपण सोडून देऊं. तुम्हीही सोडून द्या. मनांतला सारा—सारा संकोच काढून टाका. तुमच्या सुखासाठीं म्हणून हें करा. जयंतांच्या सुखासाठींही करा. निदान माझ्या सुखासाठीं तरी करा.

आणखी एक करा. आपला अशोक हा आपणां सर्वांचा आहे, नाहीं का ? तुम्ही त्याची आई आहां. लेंकराला नुसता जन्म देण्यानेंच आईपण खरेंखुरें स्त्रीच्या अंगीं बाणतें असें नाहीं. अशोकला मीं जन्म दिला खरा. पण त्याची जोपासना करून, त्याला लळा लावून त्याला तुम्हीं वाढविलें आहे. मी जयंतांचें घर सोडून परागंदा झाल्यें, तेव्हां तुम्ही आमचें घर सोडून गेलां होतां म्हणून, नाहींपेक्षां तुमच्या सुखाचा हा ठेवा मीं तेव्हां तुमच्यापासून हिरावून दूर नेलाच नसता. आतां ही आनंदाची गोष्ट आहे कीं जयंतांचे माझ्या बाळाच्या जन्माविषयींचे गैरसमज दूर झाले आहेत. ते दूर झाले असोत किंवा नसोत. असल्या गोष्टींच्या जाळ्यांत मीं गुरफटून राहिलेली नाहीं व राहूंही शकत नाहीं. आपण इथेंच पडदा टाकूं त्या गूढ गुंतागुंतीच्या गोष्टींवर. इतक्या दिवसांनीं आज माझ्या बाळाला त्याची आई लाभली, तेवढा आनंद मला पुरे आहे. आतां तुमच्या लेकराला तुम्ही सांभाळा.

मी आज तुम्हांला न सांगतां तुमचा निरोप घेऊन दूर जात्यें आहें. तुम्हीं मला सुखानें जाऊं दिलें नसतें, माझ्यावरील कमालीच्या प्रेमामुळें व माझ्याविषयींच्या अलोट आपुलकीमुळें तुम्हीं मला सुखाचा संसार करण्यासाठीं म्हणून डांबून ठेवलें असतें. त्यांत तुम्ही तुमचें, माझें, जयंतांचें, कुणाचेंही सुख जोडूं शकलां नसतां. अथांग समुद्रांत पडलेल्या जीवांनीं एकमेकांच्या गळ्याला मिठी मारून बुडून मरावें, तशी अपल्या जीवनाची दैना चालली आहे तीच अधिकाधिक चालली असती.

पण मला सांगा, ज्यांत आपणालाही सुख नाहीं, ज्यांत दुसऱ्यालाही सुख नाहीं, अशी आपल्या आयुष्याची रया माणसानें कां करावी बरें ?

जातां जातां एक गोष्ट मला तुम्हांला सांगायची आहे. मीं आपण होऊन स्वतःवर ओढवून घेतलेली गरिबी माझ्यावर जुलमानें लादली गेली आहे असा तुमचा समज झालेला दिसतो. तो बरोबर नाहीं. खरोखर मला ज्या स्थितींत आनंद वाटतो व जन्मभर वाटेल, अशाच जीवनाच्या वाटेवर मी आहें. मी अगदीं प्रसन्न मनानें आजचें जीवन जगत आहें. त्याबद्दल तुम्हीं सर्वांनीं उलट आनंद मानला पाहिजे.

आणि दुसरें असें, कीं मीं एकदां गांधीजींच्या पायांची मनोमन शपथ घेऊन सत्याग्रही व्रत पत्करलें ना ? आतां त्याचें पालन मला प्रामाणिकपणें करायला हवें. आपली भारतमाता आज वनवासी आहे ना ? तिचा वनवास संपून ती सुखी व स्वतंत्र होईपावेतों प्रामाणिक सत्याग्रहीला ह्या वनवासी जीवनांतून माघार कशी बरें घेतां येईल ? तेव्हां आमचा अखंड कालचा अर्थात् भारतमाता स्वतंत्र होईपावेतोंचा जीवनप्रवास हा असाच चालायचा.

दया ! माझ्या साऱ्या संसाराविषयींच्या आशा, इच्छा, आकांक्षा मीं सोडल्या आहेत; आणि व्यक्तीच्या चिमुकल्या लुटुपुटूच्या संसारांतून मी समाजाच्या विराट संसारांत उतरल्यें आहें. लहानशा काटक्यांच्या घरट्यांत राहायचें सोडून मी भारतमातेच्या विराट मंदिरांत सुखानें संचार करूं लागल्यें आहे. साऱ्या समाजाचा—साऱ्या राष्ट्राचा संसार सुखाचा कसा होईल याची जिव्हाळ्यानें चिंता करणारांना व्यक्तिव्यक्तींच्या संसारांचे चिमुकले चिमुकले सवते सुभे कोत्या एकलकोंडेपणानें सांभाळतां येतील का ? आणि ते सांभाळण्याचा अट्टाहास मीं करावा का ? देवमाशासारखी महासागरांत पोहण्याची सोन्याची संधि मिळाली असतांना गुडघाभर पाण्याच्या डबक्यांत मीं डुंबत राहावें ?

फार लिहिलें मी. आतां पुरे. माझ्या—नव्हे, तुमच्या अशोकला सांभाळा, एवढें पुन्हां सांगून तुमचा निरोप घेणारी,

तुमची
शकुंतला."

पत्र वाचतां वाचतां दयाच्या नेत्रांवाटें अश्रूंच्या गंगा—यमुना वाहत होत्या. सुवर्णाच्या राशींवर माध्यान्हींचे सूर्यकिरण पडून तळपावे व त्या सोनेरी प्रकाशानें डोळे दिपून जावे तशी तिची अवस्था झाली होती.

उजाडलें होतें. उमाळ्यावर सूर्य उगवूं लागला होता.

" आई ! " दयाच्या मांडीवर पहुडलेल्या अशोकानें भिरभिरत्या नजरेनें सभोंवार पाहत हांक मारली, व चिमुकल्या दोन्ही हातांनीं दयाच्या वक्षःस्थलावरचा पदर धरून तो उभा राहिला.

" माझी आई कुठें गेली ? " त्या लेंकरानें पुन्हां विचारलें.

" चला. भूक लागली का बाळाला ? " अशी त्याची समजूत करीत दया त्याला आंत घेऊन गेली.

" हें काय ? शकुंतला अजून नाहीं उठली ? " नुक्तेच जागे होऊन बाहेर आलेले डॉक्टर म्हणाले. " कशी आहे तिची प्रकृति ? "

त्यावर दयाच्या मुखांतून शब्द निघाला नाहीं. खळकन् दोन अश्रु-बिंदू मात्र गालांवर ओघळले.

" शकुंतला कुठें गेली ? बाहेर गेली ? " डॉक्टरांनीं पुन्हां विचारलें.

" शकुंतला दूर निघून गेली. न सांगतां निघून गेली ती. " दया हातरुमालानें डोळे पुशीत म्हणाली.

पूर्वेकडे सूर्य आकाशांत वर वर येत होता. शकुंतलाच्या भारताला अधिकाधिक प्रकाशमान करीत होता.

तेवढ्यांत कडेवरचा अशोक टेबलाकडे झेपावत किलबिलूं लागला, " आई ! आई ! "

" कुठें गेली आई माझ्या बाळाची ? " दया त्याच्या गालांवरून हात फिरवीत व गालांवर बागडूं लागलेले केस मागें सारीत म्हणाली.

तों बाळ ' आई ! आई ! ' करीत टेबलावर अधिकच झेपावूं लागला. म्हणून दयाचें टेबलाकडे लक्ष गेलें.

टेबलावर एक अपरिचित वही पडलेली होती. त्या वहीवर त्या लेंकरानें झडप घातली.

त्या वहीवर सुबक अक्षरांत लिहिलें होतें :

दैनंदिनी
शकुंतला जोशी.

भुजंग आपल्या मस्तकांतील तेजस्वी मण्याच्या प्रकाशांत रात्रीच्या वेळीं अरण्यांत आपलें भक्ष्य शोधीत हिंडतो, अशी एक प्राचीन लोककथा दयानें ऐकली होती. त्या लोककथेची तिला ती दैनंदिनी पाहून आठवण झाली.

शकुंतला आपल्या प्राणांपलीकडे त्या दैनंदिनीला जपत असे. 'माझ्या ह्यातींत ती कधीं कुणीं वाचायची नाहीं. मी मेल्यावर वाचावी.' असें ती अनेकदां दयापाशींही म्हणाली होती.

'शकुंतला मुद्दाम आपली दैनंदिनी माझ्या टेबलावर ठेवून गेली, कीं विसरून गेली !'

भलें मोठें प्रश्नचिन्ह दयासमोर उभें राहिलें.

# मनोगतांची उलथापालथ

दगड फेंकायला आणि फळ पडायला एक गांठ पडावी तसें झालें.

मस्तकांत सोसाट्यानें वाहणाऱ्या झंझावाताच्या झोतासरशीं शकुंतला त्या रात्रौ मध्यरात्रीं मैत्रिणीच्या बंगल्याबाहेर पडली ती भ्रमिष्टेसारखी भिर-भिर भिरभिर चालत होती. रात्र केव्हां संपली, पहांट केव्हां झाली, उजाडलें केव्हां याची देखील तिला शुद्ध नव्हती.

ती आपल्या मनानें आपल्या एकुलत्या एका अपत्याचा अखेरचा लागाबांधा तोडून बाहेर पडली खरी. ती बाहेर पडली तरी तिचें अंतर्मन तिला हांटकीत होतें, ' कुठें चाललीस ? तुला तुझ्यावरच्या जबाबदाऱ्या अशा टाळून टाळतां येतील का ? रणांगणांतून सैनिक जीव बचावून पळाला, म्हणजे तो विजयी झाला का ? तूं पळून जाशील. पण तुझ्या-मुळें ज्याच्या जीविताचा आजवर एकसारखा सत्यानाश होत आहे, त्याची तुला कांहींच का कदर नाहीं ?...त्यानें तुला दगड फेंकून मारला म्हणून तूं त्याच्यावर रागावलीस ? वेडाच्या भरांत त्यानें हें कृत्य केलें असेल असा मनाचा विरंगुळा करून तूं त्याला क्षमा करशील !... पण नाहीं. शकुंतला ! तेवढ्यानें भागायचें नाहीं. जीविताशीं इतका सोपा खेळ माणसानें खेळूं नये. जीं खेळतात तीं खेळूंद्यात. त्यांचें त्यांना. तीं सोपानाच्या जीविताशीं खेळ खेळलीं, तुझ्या जीविताशीं खेळ खेळलीं; पण तें त्यांचें त्यांना. तूं माणुसकीला जागणारी महात्मा गांधींची अनुयायी आहेस ना ? माणुसकीची पुजारीण तूं आहेस ना ? दरिद्रीनारायणांची कैवारी आहेस ना तूं ? स्वतःला तूं दरिद्री म्हणवतेस. दरिद्रीनारायणाचें व्रत तूं स्वखुषीनें स्वीकारलें आहेस. होय ना ? मग तुझ्यापायीं जो सुखासमाधानाला, अन्नाला, माणुसकीच्या जीवनाला आंचवला, तुझ्या कारणें भणंगभिकारी झाला, ज्याला जगांत कोणी वाली उरला नाहीं, कुत्र्याच्या मोतीचें जगणें मरणें ज्याच्या ललाटीं जन्मठेपेच्या शिक्षेसारखें साऱ्या समाजानें लिहिलें

आहे, त्याची विचारपूस तूं केली नाहींस, तर तूं स्वीकारलेलें व्रत हा केवळ ढोंगीपणा ठरणार नाहीं का?..."

ती डॉक्टरांच्या बंगल्यांतून पायपिटी करीत भटकत एकसारखी उजाडेपावेतों हिंडत होती. भटकत भटकत ती गिरगांवांत गांवदेवीला आली. कारण तिला तिच्या मैत्रिणीला–चित्रा पारेखला भेटायचें होतें.

नव्या पारेखसदनाच्या प्रशस्त आवारांत ती आली, तेव्हां त्या बागेंतील पुष्पांचा सुगंध हवेंत दरवळत होता. त्या सुगंधानें तिच्या श्रमलेल्या मनाला जरा उल्हास आला. कुठें परेल आणि कुठें गांवदेवी? एवढें अंतर रात्रभर पायपिटीनें तुडवून तुडवून तिचे पाय अगदीं मोडून पडण्याच्या बेताला आले होते.

तरी तशीच ती जिना चढून वर गेली. दरवाजा बंद होता. पण भय्या पहारेकऱ्यानें तिला ओळखलें. प्रथम तो क्षणभर बिचकला. कारण आजच्या कंगाल वेषभूषेंत तो तिला आज प्रथमच पाहत होता. तरीही त्याला ओळख पटायला कांहीं क्षण पुरले.

"भय्याजी! ओळख आहे?" शकुंतलानें विचारलें, "चित्राबेन उठल्या असतील का?"

"देखता हूँ बाईजी!" असें म्हणत भय्या आंत गेला.

तेवढ्यांत अंबालाल पारेख–मुंबई सरकारचे माजी कॉंग्रेस गृहमंत्री–नेहमींच्या प्रभातकालीन सहलीचा फिरण्याचा व्यायाम घेऊन माघारे आले.

शकुंतलाला त्यांनीं पाठमोरें पाहिलें. त्यामुळें त्यांना तिची ओळख पटली नाहीं. त्यांना वाटलें, कीं कोण ही कंगाल भिकारीण सकाळच्या प्रहरीं भीक मागायला त्रास द्यायला आली?... तिला पाठमोरी पाहतांच त्यांची तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली, कीं पहारेकरी भय्यानें या भिकारणीला इथवर येऊं दिलेंच कां?

हुकमतीच्या कठोर कर्कश स्वरांत त्यांनीं भय्याला हांक मारली, "भय्या!"

आंत चित्राबेन उठली आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं गेलेला भय्या साहेबांची हांक ऐकून भीतीनें थरथर कांपत बाहेर येऊन पोहोंचण्यापूर्वींच शकुंतलानें मागें वळून स्मितपूर्वक पाहिलें.

"कोण ?" शकुंतलाच्या कंगाल वेषांत गुरफटलेली नजर तिच्या चर्येकडे वळवीत अंबालालनीं स्मरणशक्तीला किंचित् ताण देत शकुंतलाला ओळखून हांक मारली, "शकुंतला !"

"चित्राबेनला भेटायला आल्यें आहें." शकुंतला उद्गारली.

तेवढ्यांत भय्या समोर येऊन भीतीनें थरथर कांपत हात जोडून उभा राहिला.

"जावो तुम् भय्या ! कुछ काम नहीं है." अशी भय्याची सोडवणूक करीत अंबालाल आंत जातां जातां म्हणाले, "चित्राबेन बाहरसे आयी ! अंदर है ?"

"नहीं साब ! अभी नहीं आयी छोटीबेन." धन्यांच्या रागाची आग पाखडली जातां जातां विझालेली पाहून हायसा उसासा मनोमन सोडीत भय्या उत्तरला.

"तुझीच बहीण आहे ती शकू ! तुझ्यासारखेंच तिच्याही पायांवर नक्षत्र पडलेलें आहे. ये. आंत ये. थोड्या वेळांत येईल बहुधा ती, पोलीस ठाण्यावरून तिच्या मनाजोगी लवकर सुटका झाली तर." असें उद्गारत अंबालाल आंत गेले.

"बैस. बरें, माझें तुला ऐकायचें आहे ?" अंबालालनीं वडीलकीच्या नात्यानें एकदम अकल्पित प्रश्न केला.

शकुंतला बुचकळ्यांत पडल्यासारखी झाली. पण भ्याली मात्र नाहीं. तिला एवढें कळून चुकलें, कीं आपल्या आयुष्याच्या परवडीविषयीं ते आपुलकीनें कांहींतरी बोलणार. तसें बोलण्याचा त्यांना अधिकार होता. कारण ते शकुंतलाच्या पित्याचे परममित्र होते, तसेच तिच्या सासऱ्यांचे उद्धवराव जोशींचेही परममित्र होते. आणि जयंत जोशी तर काय ?—ते मावळलेल्या मुंबई काँग्रेस मंत्रिमंडळांत गृहमंत्री होते, तेव्हां जयंत जोशी गृहखात्याचा पार्लमेंटरी सेक्रेटरी व उपगृहमंत्री होता.

"बोल. ऐकायचें आहे कीं नाहीं माझें ?" अंबालालनी कांहीं क्षण शकुंतलाच्या उत्तराची वाट पाहून पुन्हां विचारलें.

"तुमचें ऐकायचें नाहीं असें कसें होईल नानाजी ! जशी तुमची चित्राबेन तशी मी." शकुंतला विनीत भावानें उद्गारली.

" म्हणूनच तर विचारतों. चित्राबेन माझें ऐकायला तयार नाहीं, तशीच तूंही तयार नसलीस तर मग साराच ग्रंथ आटोपला. बरें. आतां पहिल्यानें आंत जा चित्राच्या खोलींत. आणि माणसाला शोभेसे स्वच्छ कपडे लेऊन ये. खरें, तुझें खादीचें व्रत आहे ना ? पण कांहीं हरकत नाहीं. चित्राबेन देखील कोणे एके काळीं माणसांत वावरत होती. कॉंग्रेस-स्वयंसेविका देखील होती ती. तेव्हांचीं तिचीं खादीचीं पातळें असतील आंत तिच्या कपाटांत. जा आंत— "

तोंच चित्राबेन बाहेरून आंत आली. पित्याचे शब्द ओझरते तिच्या कानीं पडले.

" कां ? आज देखील मी कॉंग्रेस–स्वयंसेविका आहे कीं ! कॉंग्रेसच्या नांवावर खादीला टपलेल्या लोकांचें आणि माझें पटलें नाहीं, म्हणजे मी कॉंग्रेसला विसरल्यें असें थोडेंच आहे ? " असा आव्हानाच्या स्वरूपाचा रोखठोक जबाब देत चित्राबेन आंत आपल्या खोलींत गेली.

शकुंतलाला भय वाटलें, नानाजी चित्राबेनच्या उद्धटपणाच्या उत्तरानें चिडून कांहीं अधिकउणें खारटतुरट बोलतात कीं काय ?

पण तसें कांहीं झालें नाहीं. तसें झालें नाहीं त्याचें श्रेय अर्थात् चित्रा-बेनला नव्हतें. वडिलांनीं काय, अथवा वडिलांच्या वडिलांनीं काय, कुणींही अरे म्हटलें कीं कां रे म्हणून विचारायला नेहमींच एका पायावर ती तयार असे. पण अंबालालभाईच जरा सबूरीनें वागून अलीकडे आपली झांकली मूठ सव्वा लाखाची राखून ठेवीत असत.

चित्राबेनचा शब्द कानीं पडतांच पुष्पाबेन आपल्या खोलींतून बाहेर आली. ती पुढें येऊन विचारूं लागली, " शेवटीं काय झालें यांच्या मारेकऱ्याचें ? "

" कांऽहीं झालें नाहीं. आतां पोलीसखटला होईल त्याच्यावर. " चित्राबेन उत्तरली.

" मग तुम्हीं जाऊन काय केलें ? "

" मीं त्याला फक्त जामीन राहिल्यें. "

" पण त्याचा ठावठिकाणा ? "

" ठावठिकाणा ? " चित्राबेन हंसून शकुंतलाकडे पाहत म्हणाली,

" झोंपायला धरणी आणि पांघरायला आकाश, हाच त्याचा ठावठिकाणा. यापेक्षां मीं त्याला कांहीं विचारलें नाहीं आणि त्यानें मला कांहीं सांगितलें नाहीं."

" तुम्हांला एक नसेल सांगितलें. पण पोलिसांना तरी ?"

" इतकी चांभारचौकशी मीं नाहीं केली. कां ? काय विचार आहे ? सूड घ्यायचा आहे त्याच्यावर ?"

एक उसासा सोडून शकुंतलानें मानेनें नाहीं म्हटलें.

" पण मला खरेंच, अजूनही कळत नाहीं, त्याचा तुझ्यावर एवढा दांत कां ग ? कामगार म्हणून मला गय करावीशी वाटते त्याची. मीं आजवर किती तरी प्रकारांनीं करतां येईल तेवढी मदत करीत आल्यें आहें त्याला. वेडाच्या भरांत जगाच्या पाठीवर कुठें तरी वाऱ्यासारखा भरकटत होता. कुठें तरी कुणाकडून तरी बिचारा पिसाळलेल्या कुत्र्यासारखा मारला गेला असता देखील. एकदां तर मीं ऐकलें कीं तो मुसलमान व्हायला निघाला आहे आपल्या त्या कुणा मित्राच्या शिकवणीनें..."

" कोण हा मित्र त्याचा ? कोणी मुसलमान होता ?"

" मुसलमान व्हायला निघाला होता तेव्हां. अग ! आमचा कामगारच तो. चांगला लढाऊ कामगार. तुला असेल कीं माहीत—खरें, तुमचा जांवईच कीं तो !"

शकुंतला प्रश्नार्थक चर्या करून पाहूं लागली.

" नाहीं ओळख पटत ? जाई आठवते ?"

" होय. बरें मग ?"

" तुझ्या सासूची मानलेली लेक ना ती ? तिचा नवरा फकिरा ? तूं बाळंत होतीस तेव्हां तुला सांगून नव्हत्यें पुण्याला गेल्यें ह्या दोघां आमच्या लढाऊ कामगारांना सोडवण्यासाठीं ? सोपाना आणि फकिरा ही रामलक्ष्मणांची जोडी होती जशी कांहीं. आणि आठवतें तेव्हां तुला ? माझ्या शब्दासाठीं म्हणून जयंतांनीं त्या दोघांना सोडवण्याची खटपट केली. ते सुटले, आणि थोड्याच दिवसांत सोपानाचें डोकें फिरलें."

" काल त्या वेडाच्या भरांत हल्ला केला त्यानें माझ्यावर ?"

"नाहीं. तें मीं त्याला विचारलें. मला देखील प्रथम तसें वाटलें म्हणून विचारलें. पण आतां तो मुळींच वेडा नाहीं."

"मग काय करतो आतांशा तो?"

"तो काय करतो तें सांगत नाहीं; आणि धड कांहीं बोलत नाहीं. मला वाटतें, तो करतो तें बोलत नाहीं."

"कां?"

"गरिबांना बोलायला वाचा नसते ना ग? तुझ्यामाझ्या जगांतली भाषा बोलश्यें आहे मी ही! आणि सोपाना देखील तसेंच म्हणतो. मीं त्याला सकाळींच मुद्दाम बाजूला घेऊन विचारलें कीं शकुंतला तुझी वैरीण वाटते तुला?"

"मग त्यावर तो काय म्हणाला?"

"तो 'नाहीं' म्हणाला. मग मीं त्याला विचारलें, कीं ती तुझी वैरीण जर नाहीं, तर पिसाट राक्षसासारखा तिला ठार मारायला कां उठलास तूं?"

"त्यावर तो काय म्हणाला?"

"त्यावरच तो म्हणाला कीं 'बाई! आम्ही गरीब भिकारडे लोक पडलों. आम्हांला आमचीं दुःखें बोलून दाखवायला वाचा नाहीं.' तें ऐकून मला फार कींव आली त्याची. प्रथम मला वाटलें कीं असे कांहीं वाह्यात् गुंड मवाली असतात, त्यांतला हा एक असेल. मनगटमस्तीनें एखादीवर प्रेम करायला–एखादीला जाळ्यांत ओढायला जातात; आणि डाव साधला नाहीं कीं एकदम सापासारखे उलटतात. मग ते त्या मुलीचें नाक कापतील, तिला मारतील झोडतील, वेळीं ठारही मारतील तिला. आणि मग जन्मठेपेच्या तुरुंगांत जाऊन बसतील किंवा फांसावर देखील चढतील. खरेंच! मी खोटें नाहीं सांगत तुला. इतके जिवावर उदार झालेले असतात ते. त्यांतलाच सोपाना असेल असें प्रथम वाटलें मला. पण तुझी आठवण काढतांच तो जेव्हां एखाद्या लहान पोरासारखा ओक्साबोक्शीं रडला,–खरेंच ग! इतका कळवळून रडला तो, कीं लालजी आणि शेख मिरा माझ्याबरोबर होते त्यांनाही वाईट वाटलें. शेख मिरा इतका कणखर पोलादी मनाचा ना!

माणसासारख्या माणसाला लाठ्याकाठ्यांनीं बडवून ठार करून मुडदा म्युनिसिपालिटीच्या जमिनीखालच्या गटारांत झांकण काढून फेकून देतांना सांपळ्यांतला उंदीर मांजरापुढें सोडतांना आम्ही कचरूं तितका देखील कचरायचा नाहीं. पण त्याला देखील सोपानाचा तो आक्रोश पाहून अगदीं गहिंवरून आलें. कधीं त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिलेले मीं पाहिले नाहींत. ऊं हूं! कधीं म्हणजे कधीं नाहीं. पण आज सकाळीं मीं त्या पाषाणाला पाझर फुटलेला पाहिला."

"पक्का गांधीवादी होता शेख मिरा प्रथम. तुला माहीत आहे? शाळेंत होता, आणि गांधीजींच्या असहकारितेच्या चळवळीनें भारला गेला, तेव्हां ढेकणाला देखील ठार मारायचा नाहीं म्हणे कधीं." शकुंतला म्हणाली.

चित्राबेन शेख मिराचें नांव निघतांच झुळझुळ वाऱ्यावरच्या सुगंधासारखी काळवेळेचें भान विसरून जाते, हें चित्राबेनच्या स्वभावांतील परिवर्तन आजवर ती कर्णोपकर्णीं नुसतें ऐकत होती. त्याचा प्रत्यक्ष पडताळा तिला आज पडूं लागला. एकदां तिच्या मनांत आलें देखील कीं यांत कांहीं पाणी मुरतें आहे का तिला विचारावें. पण तिनें विचारण्याचें धाडस मात्र केलें नाहीं.

"मी त्याला एकदां विचारणार आहें, इतकी वृत्ति तुझी कशी पालटली म्हणून." चित्राबेन म्हणाली.

"तुझी कशी पालटली? तशी त्याची पालटली. बरें, पण का ग? आतां जामीन आहेस तूं त्याला?"

"होय. आहें मी त्याला जामीन."

"पण तारीख लागेल त्या तारखेला तो हजर तरी होईल का पोलीस कोर्टांत?"

"न व्हायला त्यानें का कुणाची चोरीमारी केली आहे? का गुन्हेगारी केली आहे?"

"ही गुन्हेगारी नव्हे?" पुष्पाबेन शकुंतलाकडे बोट दाखवून म्हणाली, "यांच्यावर खुनी हल्ला त्यानें केला, ही गुन्हेगारी नव्हे?"

आपल्या वाढत्या जिज्ञासेचें कोडकौतुक सहज पुरवतां येतें आहे तर कां

नये पुरवूं, अशा विचारानें पुष्पाबेन मुद्दाम शकुंतलाशेजारीं चित्राबेनच्या खोलींत खुर्चीवर येऊन बसली.

शकुंतलाला संकोचल्यासारखें झालें. ती त्या दोघींच्या डोळ्यांआड होण्यासाठीं कांहींतरी निमित्त शोधूं लागली.

## २

" मी जरा फिरायला जाऊन येऊं ? " शकुंतलानें चित्राबेनला विचारलें.

" कां ? सोपानाची गोष्ट निघाल्यामुळें संकोच वाटतो तुला ? " चित्राबेननें प्रश्न केला.

शकुंतलाच्या तें ध्यानीं आलें नाहीं. इतकी ती सोपाना–फकिरा यांच्या प्रश्नांत गुरफटून गेली होती. सोपानाच्या जीविताची ही जशी परवड लागलेली तिला आढळली, तसलीच कांहीं विस्मयकारक गूढता फकिराच्या अज्ञात जीवनकथेला शोपून बसली असेल अशी तिची जाईच्या त्याबद्दलच्या घरसोडीच्या व अप्रसन्न बोलण्याचालण्यावरून कल्पना झाली होती. जाईच्या मतें फकिरा गुन्हेगार होता. पण शकुंतला तें खरें मानायला तयार नव्हती. प्रतिष्ठित गणला गेलेला समाज विषमतापूर्ण, फसव्या व दांभिक वागणुकीनें सोपाना, फकिरा यांसारख्या एरव्हीं चांगल्या माणसांना कोंडून, छळून गांजून गुन्हेगार बनवतो हा तिचा ग्रह दिवसेंदिवस अधिकाधिक बलवत्तर होत होता.

" फकिरा मला भेटेल तर त्याच्या आणि जाईच्याही आयुष्याला उजाळा देण्याचा प्रयत्न मला करतां येईल. " ती आपणाशींच विचार करीत होती.

" ध्यानीं आलें तुझ्या शकुंतला ? मी काय म्हणाल्यें तें ? " चित्राबेननें पुन्हां शकुंतलाला भानावर आणण्यासाठीं विचारलें.

" संकोच त्यांना वाटायचाच. इतर कांहीं मुलींसारख्या त्या कांहीं मुक्तावस्थेला जाऊन पोहोंचलेल्या नाहींत. त्यांना स्वतःच्या इभ्रतीची, प्रतिष्ठेची, सामाजिक दर्जाची, जग काय म्हणेल याची अजून चाड आहे. " पुष्पाबेन शकुंतलाकडे वळून पाहत म्हणाली.

" आहे ? " चित्राबेननें शकुंतलाकडे नजर वळवीत विचारलें, "शकुंतला ! तझें जग खरोखरच का अजून सोपानाच्या जगाहून निराळें आहे ? इतक्या आघातांनंतर, इतक्या यातायातीनंतर देखील तुझ्या जगाची सोपामाच्या जगाशीं सांगड जुळली नाहीं म्हणायची का ? "

" तुम्ही तुमच्यावरून जगाची पारख करतां चित्राबेन ! पण सारें जग कांहीं कम्युनिस्ट झालें नाहीं अजून. अजून जगांत पुष्कळशीं माणसें आहेत. कम्युनिस्टांच्या तावडींतून माणसांचें जग सुरक्षित राखणें, कम्यु-निझमच्या झपाटण्यापासून माणुसकीला वांचवणें, यासाठीं तर गांधीवादाचा अवतार आहे. " पुष्पाबेन मध्येंच ओघासरसें बोलून गेली.

" ऐक शकुंतला ! ऐक ! गांधीवादाची कैवारीण, बडी भांडवलदारीण, एका कोट्याधीश गांधी—गिरणीमालकाची बहीण, आणि खरें, शकुंतला ! तूं छत्रपुरांत सध्यां काम करतेस ना—सत्याग्रही म्हणून ? "

" होय. " शकुंतला हंसत उद्गारली,

" सध्यां करत्यें आहे. उद्यांचें कांहीं सांगवत नाहीं. "

" कां ? "

" दिवस मावळला आहे. काळोखी रात्र पडली आहे. भुतेंखेतें आणि हिंस्र श्वापदें संचारूं लागलीं आहेत. हीं संस्थानें म्हणजे सरकारी दडप-शाहीचे बालेकिल्ले. कुठवर टिकाव लागेल तिथें माझा यापुढें हा एक प्रश्नच आहे. "

" पण तो प्रश्न इतर जगाला. तुला नाहीं. प्रत्यक्ष तुझे सासरे छत्रपूरचे मुख्य दिवाण. मांजरीचे दांत मांजरीच्या पिलांना थोडेच लागतात ? "

यावर ' पण मांजरीच्या म्हणजे आपल्याच पिलांना बोके खातात ' असें बोलायला शब्द शकुंतलाच्या अगदीं ओठीं आले. ते आंतल्या आंत संयम-पूर्वक गिळीत ती तो विषयच चतुराईनें डावलीत म्हणाली, " पण मला सांग तूं अगोदर चित्राबेन ! ह्या भांडवलदारांशीं आणि गिरणीमालकांशीं तरी छत्रपूरचा संबंध कसा आला ? "

" हेंच तें. मला सांग, भांडवलदारांचा संबंध कुठें येत नाहीं ? जिथें संपत्तीचा वास लागेल, आवळा देऊन कोहाळा उकळतां येण्याजोगा असेल, कष्टाळू गोरगरिबांच्या पिळणुकीला पुरेसा वाव असेल, तिथें भांडवल-

शाही जगाच्या कोनाकोंपऱ्यांतून व कोनाकोंपऱ्यांत पाहिजे तिथें धांवत जाईल. मेलेल्या जनावराच्या वासानें गिधाडें नाहीं का धांवत जात? तशी."

"एकूण गेल्या दोन वर्षांत फारच प्रगति झालेली दिसते आहे तुझी चित्राबेन! वाणी तुझी मूळपासून तिखट खरी. पण तिला इतकी विषारी धार आलेली मी आज प्रथमच पाहत आहें." शकुंतला म्हणाली.

"कम्युनिझमचें भूत त्यांच्या चांगलेंच मानगुटीला बसलें आहे." पुष्पाबेन उत्तरली.

असल्या शब्दांचा झेल कसा झेलावा व प्रतिपक्षाच्या गळ्याला कसें चीत करावें, ही कला चित्राबेनला चांगलीच अवगत होती. पुष्पाबेनलाही आजवरच्या अनुभवावरून चांगलें माहीत झालें होतें कीं आपण गांधील-माशीला तिच्या घरांतून डिवचून चेव आणला आहे, ती आतां आपणाला डसून डसून बेजार करणार.

पण तेवढ्यांत भय्यानें येऊन वर्दी दिली, "लालजी आणि मिरा खालीं वाट पाहत उभे आहेत."

"मग, त्यांना आंत बोलाव कीं!" भय्या पुष्पाबेनकडे पाहत रेंगाळूं लागलेला पाहून चित्राबेन पुढें म्हणाली, "अरे भय्या! असा भितोस कां? मालकिणीला भितोस? अरे, तुला सांगितलें नाहीं का काल शेख मिरानें? अरे, जगबूड येऊं घातली आहे. मालकांचें जग ह्या जग-बुडींत बुडून जाणार आहे. आणि आपलें कष्टाळू शेतकरी-कामगारांचें नवें जग त्या जगाची जागा घेणार आहे. त्या नव्या रम्य जगाकडे मर्दासारखा पाहून वागशील कीं नाहीं तूं जरा? जा. त्यांना आंत घेऊन ये जा. थोरले साहेब, धाकटे साहेब, कोणी नाहींत घरांत म्हणावें. भ्यायचें कारण नाहीं. ही चित्राबेन या घरांत आहे, तोंवर तरी या घराचे दरवाजे तिच्यापुरते साऱ्या कष्टाळूंना, कंगालांना, रंजल्यागांजल्यांना मोकळे आहेत. काय; तुला धीर नाहीं होत त्यांना आंत बोलवायचा? थांब. मीच जात्यें."

तशीच चित्राबेन खालीं जायला उठली. ती नुसती त्या पाहुण्यांना आंत बोलावून आणण्यासाठीं उठली असें नाहीं. कामगारांबाबत अथवा अशाच दुसऱ्या गोष्टींबाबतच्या वाटाघाटी त्यांना नेहमीं कराव्या लागत

असत. त्या घरीं करण्याची सोय नसे. घरीं कामगारांच्या चळवळीच्या तंत्रानें कामगारांविषयीं सक्रिय सहानुभूति बाळगणारी अशी एकटी चित्राबेन. बाकीच्या सर्वांचें कामगार चळवळ पूर्ण कॉंग्रेसधार्जिणी नाहीं म्हणून त्या चळवळीशीं विळ्याभोपळ्याइतकें सख्य.

शिवाय यूरोप–आशियांतील महायुद्धाच्या झळीनें तर कामगार चळवळ व कॉंग्रेस यांच्यांतील उरल्यासुरल्या सलोख्याचें वातावरण फार तापून दिवसेंदिवस विरोधी बनत होतें. कारण मुंबईत व देशांत इतर ठिकाणींही कामगार चळवळीचीं सूत्रें बरींचशीं लाल बावट्याच्या अर्थात् कम्युनिस्टांच्या हातीं होतीं.

कॉंग्रेसची घोषणा युद्धविरोधाची, तर कम्युनिस्ट सर्वतोपरि युद्ध-सहकाराला सिद्धहस्त असलेले. चित्राबेन आतां कम्युनिस्टांच्या गोटांत मोडूं लागली होती.

चित्राबेन बाहेर आपल्या सहकारी भाईशीं बोलायला गेली. ती गेलेली पाहतांच शकुंतला पुष्पाबेनला म्हणाली, "चित्रा आतां पुरीच कम्युनिस्टांच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागलेली दिसते."

"होय. पाहा ना!" आपण बोललेलें चित्राबेनला ऐकूं जात नाहीं इतकी सावधगिरी बाळगीत सभोंवार साशंक दृष्टीनें न्याहाळीत पुष्पाबेन म्हणाली.

"दोन्ही घरांत हें खपतें ?" शकुंतलानें विचारलें.

"पदरीं पडलें आणि पवित्र झालें, अशा निरुपायानें साऱ्यांना खपवून घ्यावें लागतें."

"लग्न अजून केलें नाहीं तिनें ?"

"नाहीं. आणि आतां मला तरी ती माझी वहिनी होण्याचीं फारशीं अनुकूल लक्षणें दिसत नाहींत."

"कां ? कुंदनमलजींना तिची ही वर्तणूक पसंत नसेल !"

"नाहीं. त्यांची तशी पाहिली तर सार्वजनिक कार्याला मुळींच आडकाठी नाहीं..."

"हिच्या कम्युनिस्टधार्जिण्या चळवळी त्यांना मानवतात ?"

"सर्वसाधारण रीतीनें मानवतात तर काय ! हें पाहा, तुम्ही

जाणतांच. खेरें, मला अगोदर सांगा, आजकाल तुमचा राजकारणी रंग कोणता आहे ? "

" तुम्हांला कोणता आहेसा वाटतो ? "

" आमच्या माहितीप्रमाणें तुम्हीं सत्याग्रहाचें व्रत घेतलें आहे ना ? रचनात्मक कार्यक्रमाला वाहून घेतलें आहे ना तुम्हीं आजकाल ? "

" होय. "

" तुमचा छत्रपूर संस्थानांत एक सेविकाश्रम देखील आहे, असें दादा सांगत होता. आणि रजनी देखील सांगत होते. फार अभिमान वाटतो त्यांना तुमच्या त्या रचनात्मक कार्याबद्दल. मला वाटतें, रजनी तुमच्या आश्रमाला भेट द्यायला देखील एकदां आले असावे एक दोन महिन्यांपूर्वी. "

" होय. आले होते. "

" आतां आम्ही जवळजवळ छत्रपूरकरच झालों आहों म्हणा कीं ! तुम्हांला माहीत असेल, छत्रपूरची साखरेची गिरण, कापडाची गिरण आम्हींच विकत घेतली आहे. आणि तो खंडोबाचा डोंगर.—"

" ॲल्युमिनियम पुष्कळ आहे त्या डोंगरांत म्हणतात. "

" होय. त्या डोंगरांत ॲल्युमिनियमच्या खाणी काढण्याची मक्तेदारी देखील आम्हांला मिळाल्यासारखीच आहे. शिवाय त्या डोंगरांत नैसर्गिक रंगांची तऱ्हेतऱ्हेची मातीही सांपडते. सांगतों काय, कीं आम्ही आतां जवळ जवळ छत्रपूरकरच झालों म्हणून ! रजनींचा तर विचार आहे कीं आतां कायमचें ठाणें छत्रपूरलाच ठेवायचें. इथला गिरण्या-कारखान्यांचा कारभार दोघांच्या वतीनें कुंदनमल पाहतील, आणि छत्रपूरचा कारभार आम्ही पाहूं. "

शकुंतला तें ऐकूनही स्तब्ध होती.

" कां ? तुम्ही बोलत कां नाहीं कांहीं ? " पुष्पाबेननें विचारलें.

" योजना चांगली आहे. पण—बाकी, कोणतीही चांगली फार मोठी गोष्ट करायची म्हटली, तर जशी यशाची अपेक्षा मोठी, तसाच धोक्याचाही संभव मोठा. नाहीं का ? " शकुंतला तिला मनांतून जें बोलावेंसें वाटत होतें, तें बोलण्याचें मोठ्या युक्तीनें टाळीत सारवासारवीच्या भाषेत म्हणाली.

“ धोका तर आहेच. तो धोका कुणीं तरी पत्करायला हवा ना ? त्याखेरीज आपल्या देशाचें पाऊल पुढें कसें पडेल शकुंतलाबाई ? आपल्या भारतमातेचा वनवास कसा टळेल ? देश संपन्न कसा होईल ? ”

तेवढ्यांत चित्राबेन आंत आली, ती वहिनीच्या तोंडच्या वाक्याचें पूर्वसूत्र धरून बोलत आली, “ देश संपन्न कसा होईल यासाठीं आम्ही अगदीं झुरणीला लागलों आहों सारीं. आम्ही लक्षाधिशांचे कोट्याधीश आणि कोट्याधिशांचे दशकोट्याधीश झालों, देशांतील पुष्कळसे गिरण्या-कारखाने आमच्या मालकीचे झाले, गोरे भांडवलदार देशांतून पिटाळले गेले, कीं देश संपन्न होईल. भारतमातेचा वनवास संपेल. असें आपल्या पुष्कळशा देशभक्तांना वाटतें. अशा एका थोर देशभक्ताच्या थोर देशभक्त सहचारिणीशीं बोलते आहेस तूं शकुंतला ! नीट ध्यानीं घे. ”

चित्राबेन आंत आलेली पाहतांच पुष्पाबेननें चटकन् तिथून काढता पाय घेतला.

“ पुष्पाबेन कां गेली इतक्या घाईनें निघून ? ” शकुंतलानें प्रश्न केला.

“ देशाला दरिद्री करायला निघालेल्या लोकांपैकीं मी एक नष्ट मुलगी आहें. कम्युनिस्ट लोक हे हिटलर—मुसोलिनी—जपानचा टोजो यांच्या विरुद्ध युद्धाचा वणवा जगभर पेटवून त्यांचा नाश करण्याच्या जागतिक मोहिमेपायीं भारतमातेला अधिकाधिक वनवासी बनवीत आहेत, असा पुष्पाबेनचा—म्हणजे मी म्हणत्यें आमच्या कॉंग्रेसनिष्ठ हिंदी पुंजीपतींचा दावा आहे. खरें, शकुंतला, तुलादेखील आला असेल कीं छत्रपुरांत रचनात्मक कार्य करतांना हा अनुभव. बरें; तुला आतां बाहेर जाऊन यायचें असेल ना ? आमचे छोटे जोशीसाहेब कुठें ठेवून आलीस ? जा. त्यांना खालून घेऊन ये कीं ! तूं कांहीं अगदीं परकी नाहींस इथें. जा. घेऊन ये बेबीला इकडे. आणि हें बघ, जाशील ती पायांनीं जगाच्या प्रदक्षणेला निघूं नकोस. सुतानें स्वर्ग गांठायच्या योजना आपण स्वर्गांत गेल्यावर पार पाडूं. तोंवर जगांत जगायचें तर जगाबरोबर चालायला हवें आपणाला. खालीं डॉक्टरांची मोटार आली आहे तुझा शोध करायला. जा. ”

“ मोटार आली आहे ? ”

“ होय. ”

" आणि कोण आहे मोटारींत ? "

चित्रानें हंसत हंसत पण ओठांवर बोटाची धार धरून शकुंतलाला बजावून सांगितलें, " चर्चा नको. माणसानें सांगितलेलें ऐकावें. "

" चर्चा नाहीं करीत मी. पण तूं येते आहेस ? "

" मी येऊं ? "

" होय. मला तुझ्याशीं बरेंच बोलायचें आहे. तें इथें नाहीं बोलतां यायचें. आपण दूर, माझ्या बिऱ्हाडीं जाऊं. "

" तुझें बिऱ्हाड ? "

" होय. "

" तें कुठें आहे ? "

" अग ! चल. दाखवत्यें चल ना ! आपण एक मात्र करूं. खालीं मोटार डॉक्टरांची आली आहे ना ? "

" होय. "

" आणि अशोक आला आहे मोटारींतून ? "

" होय. तुला माघारी न्यायला. "

" मग आपण असें करू. भाड्याची मोटार करून अशोकला बरोबर घेऊन जाऊं. डॉक्टरांची मोटार माघारी जाऊं दे. कसें ? "

" चालेल. "

" मला इथें या बंगल्यांत मुळींच राहूं नयेसें वाटतें बघ चित्राबेन ! क्षमा कर मला. पण आयुष्यांत जें कुंद वातावरण टाळून जगायचा प्रयत्न मी करत्यें आहें, तेंच नेमकें इथें माझ्या वांट्याला येऊं घातलें आहे बघ ! अंबालालभाई येण्यापूर्वी मला इथून एकदांचा काढता पाय घेऊं दे. आगींतून उठून फुफाट्यांत पडल्यासारखें कुचंबल्याप्रमाणें वाटतें आहे मला. "

" ही आग आणि हा फुफाटा टाळून आपण दोघीही बाहेर पडूं शकुंतला ! " चित्राबेन शकुंतलाच्या खांद्यावर हात ठेवून तिच्याकडे टक लावून जिवाच्या ओढीनें पाहत उद्गारली.

चित्राबेनच्या त्या उद्गारांत व नजरेंत असें काय आकर्षण होतें नकळे. पण रखरखीत वाळवंटांतून वणवण फिरणाऱ्या दमल्याभागल्या पांथस्थाला

गारव्याची थंडगार हिरवळ सांपडून विरंगुळा वाटावा तसें हायसें शकुंतलाला वाटलें.

अधिक चर्चा करीत बसायला ही वेळ व ही जागा अनुकूल नाहीं हें ओळखून शकुंतलानेंही अधिक चर्चा करण्याचा अट्टाहास धरला नाहीं.

"शेख मिरा आला होता ना भेटायला ?" शकुंतलानें बाहेर जातां जातां विचारलें.

"आला होता. मग बोलूं." असें शकुंतलाला सावध करीत चित्राबेन तिच्यामागोमाग बाहेर पडते, तोंच अंबालालभाई व कुंदनमल वर येतांना त्यांना जिन्यांतच भेटले.

"कुठें चाललां ?" अंबालालनीं विचारलें.

त्यांच्या मागोमग उर्मिलाबेन येत होत्या. त्यांनीं तर खालूनच लेकीला मातेच्या जिव्हाळ्यानें पण कडवट भाषेंत म्हटलें, "चित्रा! कुठें चाललीस तूं ?"

"बाहेर जात्यें—ही आली आहे, हिच्याबरोबर जरा."

"आतां बाहेर जायचें नाहीं. चल माघारी." अंबालालभाई म्हणाले. ते नुसत्या हुकमतीच्या भाषेंत बोलून थांबले नाहींत. त्याहून अधिक हुकमतीच्या करडेपणानें त्यांचा हात चित्राला अडवण्यासाठीं पुढें सरसावला.

"चल माघारी." असें म्हणून उर्मिलाबेननीं तिचा हात पकडला व तिला माघारें वळविलें.

"मी काय अगदीं लहान कुक्कुली बाळ आहें ?" चित्राबेननें कपाळाला तिरस्काराच्या आंठ्या घालून आपल्या आईबापांकडे बोंचक नजरेनें पाहत विचारलें.

"आणि शकुंतला! तूं सुद्धां माघारी आलीस तर बरें होईल." उर्मिलाबेन शकुंतलाकडे वळून म्हणाल्या.

"भूतकाळांत माणसानें रमून बसणें हें जिवंतपणाचें लक्षण नव्हे म्हणतात ना उर्मिलाबेन ? मीं माघारी येणें म्हणजे भूतकाळांत येणें होय, नव्हे का ?" शकुंतलानें जिन्याच्या पायऱ्या उतरतां उतरतां थबकून मागें वळून पाहत विचारलें.

अंबालालभाई तेवढ्यांत कुंदनमलपाठोपाठ जिना चढून गेले होते.

त्यांनीं जातां जातां शकुंतलाच्या तोंडचे शब्द ऐकून वरूनच दिवाण-खान्याच्या दरवाजांतून विचारलें, " होय. पण शकुंतला ! भविष्यकाळाचा माग काढीत जातीं पावलें जोडतांना समोर भविष्यकाळाच्या प्रवेशद्वारांत तुटलेला कडा असला, तरीदेखील माणसानें कड्यावरून उडी घ्यावी ? "

शकुंतला त्यावर कांहीं बोलली नाहीं. अंबालालभाईंना ती वडीलधारें माणूस मानीत असे. वडीलधाऱ्यांच्या शब्दावर ती शक्यतों प्रत्युत्तरें करीत नसे. आणि दुरुत्तरें देण्याचें तर टाळीच.

" रावसाहेब जोशी आले आहेत छत्रपूरहून. त्यांना तुझी भेट घ्यायची आहे; आणि चित्रालाही भेटायचें आहे त्यांना. " उर्मिलाबेन म्हणाल्या.

" कां ? माझ्याशीं काय करायचें आहे त्यांना ? " चित्राबेननें शकुंतला-कडे ओझरतें पाहून अर्थपूर्ण दृष्टि आईकडे वळवीत विचारलें.

" त्यांना छत्रपूरचें राज्य राखायचें आहे. तुमच्यासारखें राज्य उलथून टाकायचें नाहीं त्यांना. " उर्मिलाबेन जरा घुश्यांत उद्गारली.

" मग तर आम्हांला इथें मुळींच थांबायचें नाहीं. छत्रपूरचें राज्य तुम्ही खुशाल करा म्हणावें त्यांना. पण त्या राज्यकारभाराचा गाडा ओढणारीं भारवाहक गाढवें आम्ही होऊं अशी अपेक्षा कधीं कधीं देखील करूं नका. " असें म्हणून चित्राबेन बेडरपणानें शकुंतलाचा हात हातीं धरून जिना उतरूं लागली.

आजचीं एकंदर लक्षणें मला कांहीं ठीक दिसत नाहींत चित्रा ! " शकुंतला चित्राचा हात धरून जिना उतरतां उतरतां म्हणाली.

तोंच वरून अंबालालभाईंची कर्णकठोर हांक त्या दोघींना ऐकूं आली, " चित्रा ! मागें फीर. शकुंतलाला जायचें असेल तर जाऊं दे. तूं मुकाटपणें मागें फीर. बऱ्या बोलानें मागें फीर. "

इतक्या निकरानें कौटुंबिक संबंध तुटेपावेतों ताणले जाऊं लागल्याची आणीबाणीची वेळ चित्रा आज आयुष्यांत प्रथमच अनुभवीत होती. वडिलांचा शब्द इतक्या निकरानें तिनें आजवर कधींच मोडला नव्हता.

" जा चित्राबेन ! तूं माघारीं जा. " शकुंतला म्हणाली.

चित्राबेन काय करावें, कसें करावें, अशा दारुण संभ्रमांत पडल्या-सारखी क्षणभर जिन्यांतच गोंधळली.

" माझें ऐक तूं; माघारीं जा. माणसानें भिऊं नये. आल्या प्रसंगाला धीटपणें तोंड द्यावें. तूं माघारीं जा. "

शकुंतलानें आपल्या उद्गारांत ध्वनित केलेल्या प्रसंगाचें गांभीर्य चित्रा-बेनलाही चांगलेंच जाणवत होतें. आपल्या दांतांखालीं आपलेच ओंठ चावीत कांहीं क्षण तिनें विचार केला. ज्या अर्थी कुंदनमल आज आले आहेत, आणि आपले वडील इतके कधीं नव्हत्याचे खवळले आहेत, त्या अर्थी आपण कुंदनमलना पाठविलेल्या पत्रानें हे भयंकर वादळ उत्पन्न केलें असावें अशी तिची खात्री होऊन चुकली. आपण ज्या नावेंत बसलों आहों, ती नाव त्या वादळांत हेलकावत किनाऱ्याला जाऊन लागते, कीं मध्येंच फुटते, असा गंभीर संदेह तिच्या मनांत कोळ्याच्या जाळ्यासारखा वाढून तिचें मन गुरफटून टाकूं लागला.

" नाहीं. नाहीं. मी असल्या कसल्याही बंधनांना जुमानणार नाहीं. माझ्या मनाला योग्य वाटतें, माणुसकीला शोभतें, तें मी करणार. विधात्याचा विधाता आला तरी तोही माझी शेख मिराच्या जीवनाला मिळत असलेली साथ तोडूं मोडूं शकणार नाहीं. कुंदनमलजींना माझ्या तोंडून माझा हा कठोर निर्णय ऐकायचा असेल, तर त्यांची इच्छा पुरवायलाही माझी ना नाहीं... " असा मनोमन निर्णय घेत तिनें शकुंतलाला म्हटलें, " बरें, आतां आपली भेट पुन्हां कधीं ? "

" पुन्हां भेट ?... " एवढें बोलून चांचरत शकुंतला सावकाश जिन्याची पायरी उतरूं लागली.

तिच्यामागोमाग खालच्या पायरीवर पाऊल टाकतां टाकतां चित्राबेननें जिन्याच्या वरच्या तोंडाशीं उभा असलेल्या भय्याला हांक मारून सांगितलें, " भय्या ! थोरल्या साहेबांना सांग, कीं मी हिला चार पावलें पोंचवून आल्यें."

भय्या हें उगाच मध्यें तोंडीलावणें होतें. अंबालालभाई जिन्याच्या तोंडाशीं असलेल्या दिवाणखान्याच्या दरवाजांतून स्वतःच तें ऐकत होते.

" बरें तर. आतां तूं यायचीच नाहीं म्हणतेस इकडे ? "

" नाहीं यायची. "

' कां ? ' असें जास्त खोदून चित्राबेननें विचारलें नाहीं. पण शकुंतला आपण होऊनच आणखी पुढें म्हणाली, " ज्या जगाचे पाश मी मोठ्या

प्रयासांनीं तोडायचा प्रयत्न करीत आहें, त्या जगांत मला पुन्हां आणून कोंडायचा साऱ्यांचा कट झालेला मला दिसतो आहे. एकच उणीव भासते आहे मला... ”

## ३

जोरानें वातावरण कापीत जाणाऱ्या भिंगरीसारखी चित्राबेन शकुंतलाचा निरोप घेऊन वर आली. ती थेट कुंदनमल पुष्पाबेनशीं बोलत बसले होते त्यांच्याकडे जाऊन म्हणाली, “ कुंदन ! मला तुमच्याशीं थोडें बोलायचें आहे. ”

“ मग ! बोल ना ! ” कुंदनमल हातांत फिरणारी टकळी थोपवीत म्हणाले.

“ तें इथें नाहीं बोलायचें. आपण बाहेर जाऊं. ” चित्राबेन म्हणाली.

“ तुमच्या घरीं ? ” पुष्पाबेननें कडवट थट्टेखोरपणानें विचारलें.

“ यांच्या घरीं. ” चित्राबेन उत्तरली.

तीं अगदीं तोकडीं प्रश्नोत्तरें. पण तीं पेटते निखारे फेकावे तशीं होतीं. त्या प्रश्नोत्तरांतील दाहकता शेजारींच आंत आपल्या खोलींत उर्मिलाबेनशीं बोलत बसलेल्या अंबालालभाईंना जाणवली. पण त्यांनीं त्यांत मन घालण्याचें बळेंच टाळलें. होतां होईतों नखाच्या कामाला कुऱ्हाडी लागूं नयेत अशी त्या दोघांचीही मनापासून इच्छा होती.

“ चला. आपण बंगल्यावर जाऊं. ” कुंदनमल म्हणाले, व उठले.

“ चला. ” चित्राबेन म्हणाली, व त्यांच्याबरोबर जिना उतरूं लागली.

बंगल्यापाशीं मोटार येऊन थांबेपावेतों दोघांपैकीं कोणी कांहीं बोललें नाहीं. अखेर कुंदनमलनांच संकोचल्यासारखें झालें. तेच पुढाकार घेऊन बोलूं लागले, “ बहुतेक आज उद्यां मला छत्रपूरला जावें लागेल. ”

खाई त्याला खवखवे या न्यायानें आपल्या संदिग्ध उद्गारांचा चित्राबेनच्या मनावर विचित्र परिणाम होईल कीं काय असें भय उगीचच मनाशीं बाळगीत ते अंमळशानें पुढें म्हणाले, “ मी रागावून त्रागा करून जातों आहें असें समजूं नकोस. ”

दिवाणखान्यांत जिना चढून येईपावेतों कुंदनमलजींचें तें मंगलाचरण साखरघोळ शब्दांत सुरू होतें. अंबालालजींच्या बंगल्यांतून निघतांनाच्या त्यांच्या स्वभावांतील कठोरपणाची जागा आतां तारुण्यसुलभ प्रणयप्रवण लालित्यानें घेतली होती.

पण चित्राबेनच्या मनावर त्याचा कांहीं परिणाम झालेला त्यांना दिसला नाहीं. आपण कांहींशा रागानें पाठविलेल्या पत्राचा हिला फार राग आला असेल का ? अशी शंका घेत ते दिवाणखान्यांतील कोचावर बसतां बसतां म्हणाले, " मला वाटतें, आणखी कांहीं दिवस तरी रजनीच्या मदतीला अधूनमधून मला छत्रपूरला जावें लागेल. कारण बोलूनचालून संस्थानी मामला. केव्हां कसा वारा फिरेल याचा कांहीं नेम नाहीं. "

" तुम्ही जा. त्याविषयीं मला कांहीं म्हणायचें नाहीं. " चित्राबेन त्यांच्या समोरच्या कोचावर बसत उद्गारली.

" माझ्या पत्राचा राग आला तुला ? " खडा टाकून तर पाहावा, या उद्देशानें कुंदनमलनीं विचारलें.

" नाहीं. राग नाहीं आला मला. पण त्याविषयींच मुख्यतः बोलायला मी आज आल्यें आहे. " चित्राबेन म्हणाली.

" तूं येणार ? "

" मी येणार. पण तुमच्याबरोबर नाहीं येणार. "

" मग कुणाबरोबर येणार ? "

' शेख मिराबरोबर येणार ? ' हा प्रश्न तेव्हां कुंदनमलच्या अगदीं ओंठांवर आला होता. पण आपल्या बिथरूं लागलेल्या प्रेयसीची इतकी क्रूर थट्टा करण्याला त्यांचें मन धजलें नाहीं; आणि मनांतील प्रश्न मनांतच मावळला.

" तें राहूं दे. आपण आपणाविषयीं बोलूं. हें पाहा कुंदन ! आपण दोघेंही आतां कांहीं अजाण कुकुलीं बाळें नाहीं. आपण दोघेंही समजूतदार आहों. जगांत सुजाणपणानें वागायला पुरेसे कमींत कमी पावसाळे आपण दोघांनींही काढले आहेत. आयुष्यांत आपण कुठें उभीं आहों हें आपणाला दुसऱ्या कुणींही न सांगतां कळायला हवें, नाहीं ? "

"मग काय, माझ्याविषयीं कांहीं शंका तुझ्या मनांत आहे ? म्हणून तूं अशी चमत्कारिकपणानें वागतेस का ?"

"नाहीं. कुंदन ! माझ्याविषयीं तुमच्या मनांत शंका आहे. म्हणून तुम्हांला माझी वागणूक चमत्कारिक दिसते. नाहींपेक्षां कालच्या पत्रांत उपस्थित केलेला मुद्दा तुम्हीं उपस्थित केलाच नसता."

"मनांत आलेली शंका माणसानें फेडून घेऊं नये ?"

"उगाच भलतीच शंका माणसानें मनांत आणूंच नये, मी म्हणत्यें."

"शंका मनांत आणूं नये असें म्हणून कसें चालेल चित्रा ? जिथें प्रेम आहे, जिथें अंतःकरण आहे, तिथें माणसांच्या विचारांना अशी भरती–ओहोटी असायचीच."

"ही कथाकादंबऱ्यांतील प्रेमाची भाषा बोलूं लागलां तुम्ही कुंदन ! पण असलें प्रेम आपणाला खऱ्या आयुष्यांत कधीं अनुभवतां येत नाहीं." आपल्या शब्दांवर कांहीं बोलण्याला कुंदनमल उत्सुक असल्याचें त्यांच्या ओठांची हालचाल सुरू झालेली पाहून चित्राबेननें ओळखलें. ती लगेच तत्परतेनें म्हणाली, "मी असल्या कथाकादंबऱ्यांतील प्रेमाला पारखी असलेली नीरस मुलगी आहें, हें इतक्या वर्षांच्या सहवासानेंही तुमच्या ध्यानीं आलें नाहीं कुंदन ?"

"एकूण प्रेमावर तुझा विश्वासच नाहीं का ? जगांत प्रेम प्रेम आपण म्हणतों तें—"

"नाटक आहे. निव्वळ नाटक आहे तें. आणि मला तर असलें नाटकी जीवन जगायचा अगदीं तिटकारा आहे."

"मग कसें जीवन जगावेसें वाटतें तुला ?"

"जें जीवन आपण जगतों तसें नाहीं; जें जीवन आपण जगत नाहीं तसें."

"म्हणजे कसें ?"

"माणसांसारखें."

"मग ! आपण माणसांसारखें जीवन जगत नाहीं ? माणसें नव्हे आपण !"

"माणसें नव्हे आपण. खरीं माणसें नव्हे आपण. निदान मी तरी जोंवर लाखों गोरगरिबांच्या पिळणुकीवर जगत्यें आहें, चैन करत्यें आहें,

राजवाड्यासारख्या ऐषआरामी बंगल्यांत राहत्यें आहें, तोंपर्यंत मला माणूस म्हणवून घ्यायचा कांहीं अधिकार नाहीं. "

" हेंच. मला तुझ्या ठायींचें जें आवडत नाहीं, तें हेंच; चित्रा ! "

" पण इथें तुमच्या आणि माझ्या आवडीनिवडीचा प्रश्न यावाच कां, मी म्हणत्यें ? आपले जीवनाचे मार्ग दोघांचे दोन भिन्न आहेत हें पुरतें माहीत झाल्यावर स्वतःला एका दावणीला बांधून घेण्याचा अट्टाहास आपण तरी कां धरावा ? "

" एकूण माझ्या प्रेमावर तुझा मुळींच विश्वास नाहीं म्हणायचा ! माझ्याविषयीं तूं साशंक आहेस ? "

" तुमच्या प्रेमाची शंका घेण्याचें कारणच कधीं पडलें नाहीं मला. "

" मग इतके दिवस आपण ही आपली फसगतच करून घेतली म्हणायची तर ! "

कुंदनमलनें एक दीर्घ उसासा सोडला. आपला प्रेमभंग झाल्याची खरी कठोर जाणीव त्याला आज प्रथमच होऊं लागली.

" आपली फसगत कुठें होते सांगूं मी ? प्रेमाचें मोल आपण पैशानें करूं जातों, तिथेंच फसगत होते. प्रेम ही बाजारांत पैशाच्या मोलांत सहज विकत घेतां येण्याजोगी वस्तु आहे असें आपण मानतों. आणि आमच्या पैशाच्या—श्रीमंतीच्या जोरावर प्रेमाची खरेदी करायला निघतों..."

इतका वेळ शांतपणें बोलणारे कुंदनमल आतां चिडूं लागले. चित्राच्या उद्गारांतील मानखंडना त्यांना जाणवूं लागली.

" मी मूर्ख, नादान, म्हणून ह्या मृगजळाच्या मागें लागलों असा जर तुझा समज असेल चित्रा ! तर तो अगदीं खोटा आहे. "

" नाहीं. माझा तसा समज मुळींच नाहीं कुंदन ! "

" मग गैरसमज असेल. "

" नाहीं. माझा तुमच्याविषयींचा गैरसमजही मुळींच नाहीं. अगदीं पुरा पुरा समज आहे. तो समज आहे, म्हणून तर मीं आजवर तुम्हांला फसवलें नाहीं आणि मी स्वतः फसल्यें नाहीं. मला तुम्हांला एवढेंच सांगायचें आहे, कीं तुम्ही आणि मी पति—पत्नी म्हणून एकत्र नांदणें

शक्य नाहीं. कारण पत्नी या नात्यानें माझ्यापासून तुमच्या ज्या अपेक्षा आहेत, त्या मला मुळींच पुऱ्या करतां येणार नाहींत."

"मला माहीत आहे, तुझा ओढा कम्युनिझमकडे आहे, म्हणून तूं हें भय व्यक्त करतेस. कम्युनिझम आम्हां गांधीवाद्यांना मान्य नाहीं हें तर खरेंच. पण सार्वजनिक जीवनांत प्रामाणिक मतभेद ज्या स्त्रीपुरुषांत आहेत, त्यांना देखील पतिपत्नी म्हणून सुखानें संसार कां करतां येऊं नये मला कळत नाहीं चित्रा!"

"बरोबर आहे तुमचें. तुम्हांला पत्नी म्हणजे मनाजोगी विलासदासी पाहिजे आहे, आणि मीही ज्या समाजांत आज स्त्रियांना विलासदासीपेक्षां ज्यास्त मोल नाहीं, अशा श्रीमंती समाजांतच जन्माला आल्यें आहें. पण – पण–"

"कां? अडखळलीस कां? स्पष्ट बोल ना!"

"जाळ्यांत अडकलेली पक्षीण जाळें तोडून निघून जाणार आहे. तिला तुम्ही–तुम्ही सारीं–आमच्या घरचीं माणसें देखील त्याला अपवाद नाहींत. सारे एका खाणींतले कोळसे."

"कोळसे? हिरे नव्हेत?"

"कोळसे! हिरे नव्हेत." कुंदनमलनीं उच्चारलेले शब्दच चित्राबेननें पुन्हां पण त्यांच्यापेक्षां अधिक ठसक्यांत उच्चारले.

थोडा वेळ दोघेंही कांहीं बोललीं नाहींत.

"हें फार मोठें अंतर पडलें आहे आपल्यांत, नाहीं कुंदन?" चित्रा संभाषणाचा तुटलेला धागा पुन्हां हातीं घेऊन म्हणाली, "कधींही न तुटण्याजोगें अंतर आहे हें. माझी मलाच जाणवते ही कुचंबणा. पण त्याला कांहीं इलाज नाहीं. आईबापांना लेक पारखी होते आहे. मित्रांना मैत्रीण पारखी होते आहे. भावाला बहीण पारखी होते आहे.— दूर—दूर—चालल्यें आहें मी ह्या बंधनांतून कुंदन! नागिणीसारखी जीवनाची कांत टाकून मी नवें जीवन जगूं पाहल्यें आहें. मला माझ्या मार्गांत कोणी अडवूं शकणार नाहीं. बोला. आहे तुमची तयारी माझ्याबरोबर ह्या अवघड कांटेरी वाटेनें यायची? आहे तयारी कष्ट

सोसायची ? दरिद्रीनारायणाचे उपासक ना तुम्ही ? गांधीजींचे चेले ? आहे तयारी तुमची गांधीजींच्या उपदेशाप्रमाणें वागायची ? ”

“ गांधीजींचा उपदेश समाजांत संघर्ष वाढवून समाजाची होळी पेटवायला निघालेल्या तुम्हां लालभडक लोकांनीं आम्हांला समजावून द्यायला नको. चित्रा ! सैतानानें बायबलाचा आधार घ्यावा तसा तुम्ही लोक गांधीजींच्या शिकवणुकीचा आधार घेतां, आणि आपल्या समाजविध्वंसक कारवायांना ओढून ताणून चंद्रबळ आणतां. आम्ही गांधीवादी व तुम्ही कम्युनिस्ट यांचें तत्त्वतः कधींच पटायचें नाहीं. विधायक कार्यावर ज्यांचा सारा भर, वर्गसमन्वय हें ज्यांचें ब्रीदवाक्य, आणि वर्गसंघर्षाची कल्पना ही ज्यांना तापदायक होते,— ”

“ नका. बोलूं नका तें कुंदन ! आपण एकमेकांना चांगलीं ओळखतों ना ? मग कां बरें ही गांधीवादाची माया तुमच्या–माझ्यामध्यें उभी करतां ? जें मला बोलायचें नव्हतें, तें तुम्ही बोलायला मला भाग पाडीत आहां कुंदन ! ज्या गांवच्या बोरी, त्याच गांवच्या बाभळी ! आपण असें करूं, गांधीवादाची वृथा कुरापत नये काढूं आपण. गेल्या पांच वर्षांपासून– आपल्या कॉंग्रेसनें मंत्रीपदें स्वीकारलीं तेव्हांपासून गांधीवादाच्या तत्त्वाची तपशिलांत कसकशी परिणति होत आहे हें आपण उघड्या डोळ्यांनीं पाहतच आहों कीं ! त्या हातच्या कांकणांना आरसा कशाला हवा ? गांधीजींच्या उपदेशाचा वारसा कांहीं एकट्या धनिकांना, भांडवलदारांना, पिळणूकदारांना दिलेला नाहीं, कुंदन ! ”

“ जाऊं द्या ! वादविवाद करून यांतून कांहींच निष्पन्न व्हायचें नाहीं. चित्रा ! माझी एक गोष्ट सोड तूं. पण तुझ्या घरच्या वडील माणसांना तुझ्या असल्या वर्तणुकीनें काय वाटेल याचा देखील तूं विचार करायला हवा होतास. ”

“ विचार केला आहे. मीं सारा विचार केला आहे कुंदन ! आतां मीं सांगितलें काय तर ? सारा विचार केला आहे मीं. आणि अगदीं समजून उमजून उघड्या डोळ्यांनीं सर्वांना मी पारखी होत्यें आहें. ”

“ एकूण आमच्या कानीं आल्या गोष्टी त्या खऱ्या तर ? ”

“ म्हणजे काय ? लोकजागृतीच्या संबंधानें बोलत असाल तर–होय.

तूर्त मी तेंच कार्यक्षेत्र निवडणार आहे. मागासलेल्या संस्थानी जनतेंत मी शकुंतलाच्या सहकार्यानें जागृति करीन म्हणत्यें. न जाणो! तिथें कदाचित् आपल्यांतील वैचारिक संघर्ष तीव्र स्वरूप धारण करीलही. आज प्रेमानें माझ्या कंठीं पुष्पहार घालायला आसूसलेले हात उद्यां माझ्या हातीं बेड्या ठोकायला किंवा माझ्यावर गोळी झाडायलाही पुढें सरसावतील.—"

"शकुंतलाच्या पावलावर पाऊल टाकून तूं चालूं लागली आहेस. खरें हें?"

तो प्रश्न चित्राच्या मर्मी झोंबला. ती तिटकाऱ्यानें मान हेलावीत उत्तरली, "एखाद्याच्या खासगी व्यक्तिविषयक जीवनांत असल्या दांडगाईनें डोकावून पाहणें हें सभ्यपणाचें लक्षण नव्हे. असो. झालें? मला वाटतें, तुमच्या पत्राला मीं इथवर दिलेलें उत्तर पुरेसें आहे. यापुढें आपण आपणां एकमेकांच्या मर्यादा ओळखून वागूं. म्हणजे संघर्ष यायचा संभव तितकाच कमी. येत्यें मी."

तोंच फोनची घंटा घण्घण् वाजूं लागली.

कुंदनमलनीं फोनचा रिसीव्हर उचलून कानाला लावला.

"होय. आहे. चित्रा एकटीच आहे. शकुंतला इथें नाहीं... विचारतों." असें म्हणून कुंदनमलानीं चित्राला म्हटलें, "रावसाहेब जोशींचा फोन आहे. तुला आणि शकुंतलाला बोलावीत आहेत."

"त्यांना म्हणावें, शकुंतलाचा ठावठिकाणा मला माहीत नाहीं. बरें मी येत्यें."

"कुठें? जोशीकडे जातेस?"

ती त्यावर कांहींच उत्तरली नाहीं. एकदम एक घाव दोन तुकडे करावे तसा त्या भेटीचा अनपेक्षित शेवट करून चित्रा एकदम दिवाण-खान्याबाहेर पडली.

कुंदनमल तो सर्व प्रकार पाहून इतके गोंधळल्यासारखे होऊन गेले होते, कीं चित्राबेन बंगल्याबाहेर पडली तेव्हां ते तिच्याशीं निरोपाचे दोन शब्द बोलायलाही विसरले.

चित्राबेन बंगल्याबाहेर पडल्यावर देखील ते भांबावल्यासारखे होऊन

स्वतःशीं विचार करीत होते, ‘ अजूनही मला कळत नाहीं, कीं चित्राच्या ह्या वागणुकीचा अर्थ तरी काय ? ’

‘ काय; तिला आपल्या नैतिक वर्तनाविषयीं संशय आहे ? भामिनी-राजे यांची माझ्याशीं घनदाट मैत्री आहे, या मैत्रीमुळें तर सवतीमत्सर तिच्या ठायीं जागृत झाला नसेल ? कीं–कीं शकुंतलासारखीच ती उठवळ वृत्तीची मुलगी आहे ? तिचे अजाणपणामुळें कांहीं गैरसमज असतील तर ते मला दूर केले पाहिजेत. त्याउप्परही ती जर आपला हेका चालवणार असेल, तर गोष्ट निराळी. ’

हातीं टकळी गर गर फिरत होती. अगदीं यंत्रासारखा टकळीवर सुताचा ताणा निघत होता. त्याला पीळ बसत होता. पीळ भरलेला धागा टकळीला गुंडाळला जात होता. यंत्रासारखा सारा व्यापार सुसूत्रपणें चालला होता.

मातींत मिसळलेल्या कस्तूरीचा वास हवेंत झपाट्यानें उडून जात होता. माती मात्र शिल्लक होती.

प्रणयाचे–प्रीतीचे सारे खरे खोटे धागेदोरे तटातट तोडीत निघून गेलेली चित्राबेन भविष्यकाळाच्या धूसर वातावरणांत शकुंतलाच्या बरोबरीनें कामगारांच्या वतीनें विरोधाचें ठाण मांडून समोर लढ्याच्या पवित्र्यांत उभी राहिलेली दिसत होती.

आणि तशांत जोशीसाहेब आजारीपणामुळें सहा महिन्यांच्या रजेवर गेले आणि छत्रपूरच्या मुख्य मंत्रीपदाची धुरा जोशीसाहेब म्हणतात त्याप्रमाणें पेलून धरण्याची जबाबदारी आपणावर पडली तर ?...”

कुंदनमल तो विचार मनांत येतांच स्वतःशींच हंसले.

बेड्या ठोकण्याची आणि गोळ्या झाडण्याची भाषा चित्राबेन नुक्तीच थोड्या वेळापूर्वीं बोलून गेली होती. ती त्यांना आठवली.

## वनवासी

डहाणू स्टेशनवर गाडी थांबली.

शकुंतला लहानग्या अशोकला उजव्या हातानें कडेवर सांवरीत डाव्या हातानें सामानाची पिशवी सांवरीत खालीं उतरली.

खालीं उतरून फाटकापार होईतों ती धडधडत्या चित्तानें एकसारखी मागें पुढें पाहत बहिरीससाण्याला पक्षीण भिते तशी भीत दचकत होती.

न जाणो! आपला ठावठिकाणा शोधीत सासरे उद्धवराव जोशी आले तर! ते अकस्मात् छत्रपूरहून मुंबईला आले, ते आपल्यासाठींच आले असावे याविषयीं शकुंतलाला मुळींच शंका नव्हती.

श्वशुरांना शकुंतला इतकी भीत होती अशांतली मुळींच गोष्ट नाहीं. तिनें काय अशी चोरी अथवा गुन्हेगारी केली होती, तर ती कुणाला भिईल?

हं! नाहीं म्हणायला छत्रपूरच्या राज्यांत असतांना भीति मात्र वाटत होती. पण ती दिवाणसाहेब उद्धव जोशी यांची नव्हे. भीति तिला छत्रपूरच्या राजवटीची वाटत होती.

ती भीतीही केवळ राजकीय अथवा अशाच अन्य कसल्याही सार्वजनिक स्वरूपाची असती, तर गोष्ट निराळी होती. त्या भीतीला अर्थ होता. अशा भयभीतीच्या पेटत्या इंधनांत हंसत हंसत पिचून पिचून मरण्यासाठीं शकुंतला नेहमींच सर्वस्वत्यागाच्या वेदीवर उभी असे. ती संकटांना आग्रह-पूर्वक आमंत्रण देणारी जरी नव्हती, तरी संकटाला भिऊन आपल्या कृतसंकल्पापासून मागें पाऊल घेणारीही नव्हती.

पण छत्रपूरच्या विद्यमान बेबंदशाही राजवटींत जिथें न्याय, नीति, सत्य, माणुसकी यांना मोल शून्य, तिथें त्यागासाठीं—मायदेशाच्या उद्धारा-साठीं विशुद्ध कर्मभूमि तरी कुठून लाभावी?

धडधडत्या अंतःकरणानें मागें पुढें पाहत शकुंतला फाटकाबाहेर पडून जाईच्या मकाणाच्या वाटेला जहांगीर बोटवाला यांच्या शेताकडे वळते, तोंच जाई घाईघाईनें धांपा टाकीत समोरून धांवत आली.

"कां ग जाई ? इतकी घांवत कां आलीस जीव घाबरा होईपावेतों ?" जाईनें येतां क्षणीं शकुंतलाच्या कडेवरील अशोकला उचलून घेतलें, व तिच्या हातांतील पिशवीला हात घालीत ती म्हणाली, "मला वाटलेंच तुम्ही या गाडीला येणार म्हणून. म्हणून तर मी इतकी धडपडत आल्यें."

"पण कां, इतकी धांदल कां तुझी ?" शकुंतलानें आपल्या हातांतील पिशवी हातांतच सांवरली व म्हणाली, "असूं दे पिशवी माझ्या हातींच. जड नाहीं ती."

धांवण्याच्या श्रमांनीं जाईच्या मुखावर घर्मबिंदू मोत्यांसारखे चमकूं लागले होते. शकुंतलानें ते आपल्या पदरानें पुसले.

"तुम्ही झोंपडीवर येऊं नका एवढ्यांत बाई! तो मवाली फिरून येईल एखादवेळीं तुमच्या पाळतीवर." जाई म्हणाली.

"कोण ग ?" शकुंतलानें 'हें आणखी कोणतें नवें संकट उभें राहिलें ?' असें मनांत चिंतीत विचारलें.

"काल तुमच्यावर हात टाकला होता ना सँभत ? धोंडा फेंकून मारला होता तुम्हांला ? तोच मेला !"

"कोण ?"

"तो सोपाना. खूळ लागून जेलखान्यांत गेला होता म्हणतात ना ? तोच."

"असें ? तो काय करीत होता म्हणालीस ?"

"तो आपला आला तो पिसाटासारखी तुमची विचारपूस करीत होता. म्हणतो कसा ? 'ती घरांत आहे ? शकुंतला ?' मीं म्हटलें, 'कशाला ? तिला ठार करायला ?' त्यावर तो म्हणतो कसा ? 'होय.' मीं म्हटलें, 'चल, काळें कर इथून. नाहीं तर शेतावरच्या गड्याला सांगून बडवायला लावीन."

"मग तो काय म्हणाला ?"

"अहो, म्हणणार काय तो ? खुळाच तो. दांत काढून लागला फिदी फिदी हंसायला. विचारतो कसा मला ? 'तुझा फकिरा आहे झोंपडींत ?' मीं म्हटलें रागावून त्याला, 'फकिरा गेला मसणांत आन् तूंही जा त्याच्यासंगें."

फकिराचें नांव कानीं पडतांच शकुंतलाला चित्राबेननें सांगितलें होतें त्याची आठवण झाली.

" फकिरा कुठें आहे ? " तिनें विचारलें.

" सांगितलें ना ? फकिरा गेला मसणांत. नांव काढूं नका त्याचें माझ्यापाशीं फिरून. " जाई चिडून उद्गारली. ती फकिराचें नांव निघतांच बाजूला मान करून पचकन् थुंकली.

" तो मुसलमान झाला आहे अलीकडे. खरें का ग ? " शकुंतलानें विचारलें.

" असें पाहा बाई ! माणूस एकदां भकला, माणसांतून उठला, कीं मग तो कांहीं झाला काय आन् नाहीं काय, काय किंमत त्याची ? "

बोलतां बोलतां जाईच्या डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं. कंठ भरून आला. कंठांतून स्वर घोगरा निघूं लागला. आपण उगीचच हिच्या मनाला त्रास दिला असें शकुंतलाला वाटूं लागलें. ती मनांतल्या मनांत चुटपुटूं लागली.

" बरें बाई ! आतां तुम्ही एक करतां का ? " जाईनें विचारलें.

" काय करूं ? "

" तुम्ही इतक्यांत नका येऊं झोंपडीवर. मी जात्यें. तो मेला फिरून येऊन बसला असला तर बघत्यें. आन् मग तुम्हांला सांगायला येत्यें. तोंवर तुम्ही शेटच्या बंगलीवर जा ना ! मीं शेटना कळवलें आहें सारें. तिथें भय नाहीं कसलें..."

बोलतां बोलतां जाई एकदम थबकली आणि कसल्या तरी नवीन रम्य जगाच्या दर्शनांत रमल्यासारखी उगवत्या सूर्याकडे फुललें सूर्यकमल वळावें तशी शकुंतलाच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागली.

शकुंतलाला तें नवलाचें वाटलें.

" कां ग ? अशी काय पाहतेस ? " शकुंतलानें विचारलें.

" कांहीं नाहीं. जा तुम्ही शेटच्या बंगलीवर. शेट मला म्हणाले सकाळीं, कीं जर बाई आल्या, तर त्यांना तिकडे पाठवून दे. आज शेटच्या बंगल्यावर उत्सव आहे ना ? "

" कसला ग उत्सव ? "

" माझ्या आईची तीथ आहे ना आज ? माझा बाबा बी तिथेंच आहे बंगल्यावर आज. आन् मी बी येणार आहें जराशानें. शेतावरचीं गुरेंढोरें, होयनाहीं बघत्यें, गवतकाडी घालत्यें गुरांवासरांना, आन् येत्यें. बाळाला घेऊन जाऊं मी ? राहतील माझ्यापाशीं ते. जा तुम्ही..."

जाई नुसतें बोलून थांबली नाहीं. अशोकबाळाला घेऊन शकुंतलाच्या अनुमतीची वाट न पाहतां सरळ आपल्या झोंपडीकडे चालूं लागली.

" जा ! आईला म्हणावें जा तुम्ही. आम्ही नाहीं येत तुमच्यापाशीं जा. " असें अशोकला लडिवाळ बोबड्या बोलांनीं समजावीत खुलवीत चालली.

" बरें. मी येत्यें जहांगीरशेटजींना भेटून, बरें का ग ? " शकुंतला म्हणाली, व बंगल्याच्या अनुरोधानें जाऊं लागली. जातां जातां जाईनें मागें वळून बघत सांगितलें, " तुम्ही नका येऊं. मी येत्यें तिकडे जराशानें बाळाला घेऊन. "

जहांगीरशेटची शेतवाडी व तें वास्तव्यस्थान शकुंतलाला खरेंखुरें आसऱ्याचें ठिकाणसें वाटलें. सभोंवार त्या शेतवाडीवर, तेथील वातावरणांतील प्रत्येक अणुरेणूवर पावित्र्य व प्रसन्नता यांची मंगल छाया ओसंडली असल्याचा भास तिला होत होता.

विशेषतः गतकालाच्या पार्श्वभूमीवर ती तेथील मांगल्यमय शोभा शकुंतलाला अधिकच रम्य व आकर्षक वाटूं लागली.

" सहारा वाळवंटांत मध्येंच हिरवळीनें डवरलेल्या व सुंदर वनश्रीनें नटलेल्या जलसंपन्न वसतिस्थानासारखी शोभते. ही जहांगीरशेटजींची शेतवाडी ! " शकुंतला सभोंवार नजर टाकीत स्वतःशीं उद्गारली.

गांधीजींच्या शिकवणुकीचा इष्ट परिणाम ज्यांच्या जीवनावर झाला आहे, व त्याप्रमाणें समाजजीवन समृद्ध करण्यासाठीं जे थोडे लोक देशांत मुकाटपणें कांहीं गाजावाजा न करतां झटत असत, अशांपैकीं शकुंतलाच्या माहितीपैकीं तिच्या ऋणानुबंधांतील पहिला आदर्श जहांगीरशेटजींचाच होता. सन १९२० सालापावेतों पूर्णपणें सरकारजमा असलेला, कलालीच्या धंद्यावर दशलक्षाधीश वैभवशाली झालेला, वीस सालच्या मुंबईच्या पहिल्या हरताळांत पूर्णपणें जुलमी सरकारची तळी उचलून धरणारा ऐषआरामी

दारूमक्तेदार आज एक वंदनीय लोकसेवक व कष्टाळू शेतकरी शोभत होता.

" जहांगीरशेट ! काँग्रेस मंत्रिमंडळांतील अधिकाराचा व मानमान्यतेचा मोह जीवनांत दाटलेल्या जळमटांसारखा तुम्हीं झटकून टाकला आणि माणुसकीला जागलां... "

ती त्या शेतवाडींतून जहांगीरशेटजींच्या बंगल्याकडे मंदगतीनें पावलें टाकीत जातां जातां स्वतःच्या मनाशीं बोलत होती. छत्रपूरहून इकडे आल्यापासून गेल्या चार दिवसांत तिथें राहून तिनें त्या भूमींत पावलों-पावलीं विकसलेल्या साध्या, शुद्ध, स्वतंत्र, कष्टाळू जीवनाचा आस्वाद घेतला होता. ती स्वतः गांधीवादी होती. गांधीजींची निष्ठावंत अनुयायी होती. गांधीजींच्या सत्य–अहिंसेच्या उदात्त शिकवणुकीनुसार समाजांत नवजीवन ओतून आपल्या भारतमातेला समृद्ध करण्यांत यापुढें आपल्या आयुष्याचा प्रत्येक कणन्‌कण व क्षणन्‌क्षण सार्थकीं लागावा, अशी तिची मनापासूनची इच्छा होती.

" गांधीजींच्या शिकवणुकींत जर इतकें अमोघ सामर्थ्य आहे, तर आपली सारी गांधीनिष्ठ–काँग्रेसनिष्ठ जनता अशी मानवतेच्या समृद्धीनें नवनवोन्मेषशालिनी कां शोभूं नये ?... "

असें विचारचक्र तिच्या मस्तकांत गरगर फिरत होतें. पण त्या चक्राची गति तापदायक नव्हती. सुखदायक होती. उन्हानें रखरखत्या जागीं विंझणवाऱ्यासारख्या सुखकर वायुलहरी अंगावरून इतस्ततः वाहूं लागाव्या तसें तिला वाटत होतें. गेले तीन दिवस तिनें तिथल्या शेतवाडीवर कष्ट करून सुखानें संसार करणारे व एकमेकांशीं खेळीमेळीनें गुण्यागोविंदानें राहणारे शेतकरी पाहिले होते. त्यांच्याशीं गप्पागोष्टी केल्या होत्या. त्यांच्या जीवनगंगेंत बुड्यांवर बुड्या मारून ती पावन झाली होती.

पूर्वीचा एका काळचा तेथील जीवनाचा इतिहास फुरसतीच्या वेळीं शेतावर बसून गोष्टी करतांना शकुंतलानें ऐकला होता. गांवगुंडी, असूया, व्यवहारांतील अप्रामाणिकपणा, वाणींत व करणींत वांद्याच्या खाटिकखान्याच्या आजूबाजूला दरवळणाऱ्या उग्र हिंसक वातावरणासारखी उग्रता, अशा साऱ्या गोष्टी आतां त्या तेवढ्या लहानशा टापूंत झपाट्यानें विलयाला जात

होत्या; व खतपाण्यावर पिकणाऱ्या समृद्ध शेताप्रमाणें नवें समृद्ध टवटवीत जीवन तिथें उफाळूं लागलें होतें.

"हें या एकाच सज्जनाला कां साधावें आणि बाकीच्यांना कां साधूं नये..." असा विचार करीत ती पुढें चालली होती.

तोंच जवळच्या फुलबागेंतून एक सुमारें पन्नाशी उलटलेला पण उत्साहानें तरणा शोभणारा शेतकरी पुढें आला.

"हा सोमनाथ का?" शकुंतलानें त्याला पाहून स्वतःशीं विचारलें. पूर्वीं एकदां–मुंबईला कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर होतें, जहांगीरशेट त्या मंत्रिमंडळांत उपमंत्री होते, त्यावेळीं ती या शेतवाडीवर जयंत जोशी-बरोबर आली होती. त्यावेळीं सोमनाथाची व तिची ओळख झाली होती.

पण ती ओळख कांहींशा विकृत स्वरूपांत झाली होती. तेव्हांही सोमनाथ जहांगीरशेटच्या शेतवाडीवर काम करून पोट भरीत असे खरा. सुखानें पोट भरीत असे.

पण जयंत जोशींनीं तेव्हां शकुंतलाला परिस्थितीची ओळख करून दिली होती ती अशी, "पाहिलास शकुंतला! हा सोमनाथ पाहिलास? हा नुक्ताच तुरुंगांतून सुटून आलेला आहे. तुरुंगांत हा गेला याचें कारण–याची सुंदर तरुण बायको, गरीबी, व जहांगीरशेटची संपन्नता. खुनी म्हणून हा तुरुंगांत गेला होता, जहांगीरशेटच्या खुनाचा वीस सालच्या हरताळांत प्रयत्न केल्याबद्दल. याची बायको जहांगीरशेटच्या नादीं लागली, त्याच्या सहवासांत मिळणाऱ्या ऐषआरामाला भुलली, आणि..."

जणूं काय आज या क्षणीं जयंत जोशी ते उद्गार आपल्या कानांत गुणगुणत आहेत असा शकुंतलाला भास झाला.

"माझ्या सोपानाला देखील काल संताप आला, त्यानें मला ठार मारायचा प्रयत्न केला, त्याच्या मुळाशीं अशीच त्याला आलेली जाच-णुकीची चीड नसेल का?..."

सोपानानें पूर्वीं दोन तीन वेळां आपला खून करण्याचे प्रयत्न केलेले तिला ओघासरसे आठवले.

"कां नये सोपानानें तरी मला ठार मारायचे प्रयत्न करूं? कां ठार

मारूं नये मला त्यानें ? केवढी भयंकर गुन्हेगार आहे मी त्याच्या दृष्टीनें ?..."

सोमनाथला दुरून पाहून तिनें हांक मारली.

"जी! जाई भेटली?" सोमनाथनें कळकळीनें विचारलें.

"भेटली." शकुंतला उत्तरली, "कां रे?"

"नाहीं; आधीं जाऊं नका झोंपडीवर—"

"कां?"

"थोरल्या धन्यांनीं तुम्हांला बोलावलें आहे माझ्याबरोबर. ते येतील आतां इतक्यांत." सोमनाथ म्हणाला.

तों जरा दूर लोकांची गर्दी उसळलेली दिसली. ती पाहतांच शकुंतलानें विचारलें, "हे इतके लोक कशाला रे गोळा झाले आहेत?"

"आज माझ्या बायकोची तीथ आहे ना बाई! थोरले धनी दरसाल तिथीला असा मोठा उत्सव करतात." सोमनाथ उत्तरला.

अगदीं कादंबरींत देखील अद्‌भुत शोभणारी ती घटना शकुंतलाला वाटली. समाजाच्या दृष्टीनें यःकश्चित् अशी एक महारीण झाडूवाली. योगायोगानें तिचा जहांगीरशेटसारख्या धनवान कलालाशीं संबंध येतो काय, तो तिच्यावर भाळतो काय, तिचा बोलबाला होतो काय, उत्सव होतो काय...अशा गोष्टी आयुष्यांत नेहमीं घडत नसतात...

अशी विचारमालिका शकुंतलाच्या हृदयांत उभी राहिली खरी. पण त्याची तिलाच किंचित् खंत वाटली.

"छे! अशी माणसाची नजर दोषांवर खिळून बसणारी असूं नये..." असे ढवळलेल्या गढूळ पाण्यांत प्रतिबिंब पाहण्याचा प्रयत्न करण्यासारखे विचारनिर्माल्याचे बोळे बाजूला सारीत ती सोमनाथबरोबर शेटजींच्या बंगल्यावर गेली. जातांना तिला शेतांतून प्रामाणिक श्रमजीवी शेतकऱ्यांच्या संगतींत हिरव्यागार शेतांतून, बागेंतून जातांना तिच्या मनाला कितीतरी उल्हास वाटला.

पण तिनें बंगल्याच्या पुढच्या पोर्चमध्यें पाऊल ठेवलें, तोंच रानांत अचानक भेटणाऱ्या वाघासारखे जयंत जोशी समोर बसलेले तिला आढळले.

## २

अकल्पितपणें तो भेटीचा योग आला. पहिल्या क्षणीं शकुंतला किंचित् गोंधळल्यासारखी झाली. कारण, दोन वर्षांपूर्वी ती रामगड कॉंग्रेसला म्हणून गेली, ती परस्पर मुंबईहून. आणि तेव्हांपासून आजवर तिची व जयंत जोशींची भेटगांठही नव्हती. रावसाहेब उद्धवराव जोशी छत्रपूरचे दिवाण होते, व शकुंतला तेथील एक सत्याग्रही लोकसेविका होती. पण ती एक सरकारला नावडती असलेली कॉंग्रेस स्वयंसेविका, व ते त्या राज्याचे शासनाधिकारी दिवाण.

शिवाय ती दोन वर्षांपूर्वी कुणालाही न सांगतां, न विचारतां घर सोडून गेलेली. जयंत जोशी तेव्हां कांहीं तुरुंगांत गेले नव्हते. गांधीजींच्या प्रातिनिधिक सत्याग्रहाच्या मोहिमेंत त्यांनीं तुरुंगवास पत्करला तो त्यानंतर. शकुंतलानें गांधीजींची—कॉंग्रेसची वैय्यक्तिक सत्याग्रही म्हणून मान्यता मिळवून तुरुंगवास पत्करल्यानंतर—ती तुरुंगांतून सुटून आल्यावर.

“ शकू ! मी तुला इथें अचानक भेटलेला पाहून आश्चर्याचा धक्का बसला असेल, नाहीं ? ” जयंत जोशी म्हणाले.

शकुंतला त्यावर कांहींच बोलेना.

“ इतकें तुला गांगरून जाण्याचें कारण नाहीं शकू ! तुझ्यावर कोणतेंही दडपण घालण्यासाठीं मी आज आलेला नाहीं. मी तुरुंगांत होतों. तुला माहीत आहे ? ”

खालच्या मानेनें पण वर नजर करून ओझरतें पाहत मानेनें होकार देत शकुंतला जयंत जोशींसमोरच्या खुर्चीवर बसली.

“ मला फार दिवसांपासून तुझी भेट घ्यावी घ्यावीशी वाटत होती. पण मध्यें अनेक प्रकारच्या अनेक अडचणी उभ्या होत्या. त्या टाळून एकदां भेट घ्यावीच या दृढ हेतूनें मीं—दोन दिवसांपूर्वीं तूं मुंबईला आल्याचें ऐकलें आणि मुंबईत तुला भेटायचेंच या इराद्यानें पॅरोलवर सुटका करून घेतली. ”

“ कां ? मुंबईपेक्षां छत्रपूर लांबीच्या अंतरावर, म्हणून तिकडे यायला सवड झाली नाहीं ? ” शकुंतलानें आपल्या पतीचा हा देखल्या देवा दंड-

वत आहे असा ग्रह करून घेत विचारलें, "कीं पॅरोलवर देखील छत्रपूरला जायला सरकारी बंदी होती?"

"बंदी होती. बंदी सरकारची म्हटली तर होती व म्हटली तर नाहीं."

"कां? आपलेच दांत आणि आपलेच ओंठ, म्हणून चावायचें जिवावर आलें?" शकुंतलानें मुद्दाम कांहींसा खोंचदार प्रश्न केला.

"होय." जयंत जोशी हंसरी चर्या करून म्हणाले, "कांहींसा तसाच प्रकार होता म्हणेनास! पुत्राला तुरुंगांत लोटायचा प्रसंग पित्यावर येऊं नये, म्हणून मला मन आवरावें लागलें."

"राजकारणाच्या आणि समाजकारणाच्या संघर्षांत रक्ताचीं नातीं देखील एकमेकांना नडतात म्हणायचीं?"

"होय. नातीं नडतात; नातीं तुटतात देखील. आपोआप तुटलीं नाहीं तर तीं तोडावीं देखील लागतात."

बोलतां बोलतां जयंत जोशींची वृत्ति गंभीर झाली. शकुंतलानें तें पाहिलें.

"पण नातीं तुटल्यावर तरी समुद्रांत खडकावर आदळून फुटलेल्या जहाजांतील न पोहतां येणाऱ्या उतारूसारखी आपली गत होतां कामा नये. फुटकी मोडकी फळी, काय हातीं लागेल तिचा आधार घेऊन आपणाला किनाऱ्याकडे येतां आलें पाहिजे. खरें ना?" तिनें म्हटलें.

शकुंतलाचे ते उद्गार अगदीं मोघम, अगदीं संदिग्ध, व जयंत जोशीं-सारख्या सहवासांत सरावलेल्या व्यक्तीलाही घोटाळ्यांत पाडणारे होते. त्यांना कल्पना करतां येईना कीं काय हेतूनें शकुंतला असें बोलली? तिचें व आपलें पतिपत्नींचें नातें तुटल्यांत जमा आहे, त्याला अनुलक्षून ती बोलली काय?

"मग फुटक्या नावेंतील पोहूं न येणाऱ्या ह्या प्रवाश्याला कोणती फुटकी मोडकी फळी तूं देणार आहेस?" जयंत जोशींनीं प्रश्न केला.

"आपण दोघेंही एकाच फुटक्या नावेंतून समुद्रांत कोसळून पडलेलीं नाहीं का?"

"होय. पण—"

अर्धवट वाक्य बोलून जयंत जोशींची जीभ अडखळली. ‘ होय ’ ते म्हणाले. पण त्यांतही कांहीं किंतु होता.

“ कां ? असे कांचरतां कां ? आपणांला मिळालेलें आयुष्य फार तोकडें आहे. त्या मानानें कामाचे आपणांसमोर पडलेले डोंगर प्रचंड आहेत. नुसत्या विचारांत—नुसत्या शब्दच्छलांत आयुष्य वायां दवडून कसें चालेल ? ”

“ म्हणून तूं दोन वर्षांपूर्वी कुणाला न सांगतां घर सोडलेंस काय ? ”

“ आपण उगीचच्या उगीच हीं खोल पाण्यांत शिरत आहों असें नाहीं तुम्हांला वाटत जयंत ? ” शकुंतलानें नम्र पण वाढत्या निग्रही वृत्तीनें विचारलें, “ त्या शिळ्या कढीला ऊत आणण्यांत अर्थ काय ? झाल्या गेल्या गोष्टी होऊन गेल्या—”

“ गोष्टी होऊन गेल्या. पण त्याचे परिणाम घडलेले दूर झालेले नाहींत. अंतःकरणाला त्या परिणामांमुळें झालेल्या जखमा—”

“ त्या जखमा आपोआप आज ना उद्यां भरून येतील. काळ हें त्यांवर फार दिव्य औषध आहे. ”

“ नाहीं. त्या जखमा तशा भरून येणार नाहींत शकू ! हें पहा, आपण ही आडवळणांची भाषा सोडून देऊन बोलूं. तूं गांधीवादी आहेस. मीही गांधीजींचा अनुयायी आहें. भारतमातेच्या सेवेकारणें देह झिजविण्याची सदिच्छा आपणां दोघांच्याही मनांत वसते आहे. ”

“ दोघांच्या जीवनांतील संसारी सहवासांत ती सदिच्छा दोघांच्याही अंतःकरणांत खुरटून वायां जात आहे असें नाहीं वाटत तुम्हांला जयंत ? नाहीं वाटत ? अगदीं आपल्या मनाला साक्ष ठेवून खरें खरें सांगा. जर ती सदिच्छा खुरटत नसती तर तिला हे फुटत आहेत असे डेळेफांटे फुटले असते का ? ”

बोलतां बोलतां ती थांबून जयंत जोशींच्या चर्येकडे टक लावून पाहूं लागली.

“ हें तुझ्या जीवनाचें वस्तुस्थितीच्या जलाशयांत उमटलेलें प्रतिबिंब जर तूं मला शब्दांनीं चित्रित करून सांगत असशील, तर गोष्ट निराळी आहे. ” जयंत जोशी म्हणाले.

“ माझ्या शब्दांत तुमच्या अंतःकरणाचें प्रतिबिंब उमटलेलें नाहीं दिसत तुम्हांला ? नाहीं दिसत ? नाहीं दिसत ? ”

प्रथम ‘ नाहीं दिसत ’ असें स्पष्ट सांगून टाकण्यासाठीं शब्द जयंत जोशींच्या ओठांवर आले होते. पण तोच प्रश्न शकुंतलानें तट्कारून लागोपाठ तीनदां विचारला, तेव्हां त्यांना नकारात्मक उत्तर देण्याचें धैर्य होईना.

“ हें पाहा जयंत ! आपण आपल्या आयुष्यांत घडलेला अपघात—पतिपत्नींचें कांहीं काळ जोडलेलें नातें—जरा विसरूं; आणि योगायोगानें या जीवनांत जवळ आलेलीं प्रामाणिक माणसें या नात्यानें एकमेकांच्या मनाला साक्षी ठेवून बोलूं. अगदीं खरें खरें बोलूं—”

“ आणि आजवर आपण एकमेकांशीं खरें बोललोंच नाहीं ? खरें वागलोंच नाहीं एकमेकांशीं ? ”

“ नाहीं. ”

“ नाहीं ? ”

“ नाहीं. आपण पोहलों, पण मृगजळांत. ”

“ आपला आजवर झालेला संसार हें मृगजळच होतें का ? ”

“ नव्हतें ?”

“ मृगजळ होतें तें ? आणि आपला अशोक—”

“ तें तर मृगजळांत फुललेलें कमळ—चिखलांत उगवलेलें कमळ तुम्हींच ठरवलें आहे ना ?—”

एकदम शकुंतलाला त्या शब्दासरसा जोराचा हुंदका आला. आपणच आपल्या काळजाला डंसल्यासारखें चमत्कारिक कांहींतरी तिला वाटलें.

सरपटत निरुपद्रवीपणानें जाणारी नागीण एकदम चिडून फणा उभारून फुत्कारत उभी राहावी, तसा शकुंतलेचा अवतार तेव्हां जयंतला भासला.

“ शकू ! शकू ! ” विद्ध चित्तानें हळवे बनलेले जयंत जोशी अपराधी वृत्तीनें मंद पावलें टाकीत पुढें झाले.

शकुंतला त्यांना भिऊन म्हणून नव्हे; पण त्यांना टाळण्यासाठीं उठून दोन पावलें मागें सरकली.

“ माणूस चुकत नाहीं का शकू ? ” जयंत जोशींनीं जागच्या जागीं थबकून दीनवाणीनें विचारलें.

“ चुकतात. माणसें चुकतात. पण एकदां झालेली चूक सुधारून

त्यापासून जरूर तो बोध घेऊन पुढें सरळपणानें वागण्यांतच माणसाची माणुसकी दिसून येते. "

" मला माझी चूक सुधारून माणूस व्हायची संधि तूं देणार नाहींस का ? " जयंत जोशींनीं पदर पसरल्यासारखे दोन्ही हात पसरून बापुडवाण्या वृत्तीनें विचारलें.

" मला माझी चूक सुधारून साध्य झालेली माणुसकी टिकवून धरायची संधि तुम्ही मला देणार नाहीं का ? "

तो प्रश्न ऐकतांच जयंत जोशी एकदम प्रचंड प्रकाशझोत नजरेवर पडल्यासारखे दिपून जाऊन गोंधळले.

' आपण भावीत काय आहों आणि ही भाकित कसलें ऐकवीत आहे ? ' हें मोठें थोरलें न उलगडणारें कोडें त्यांना पडलें.

" मी आज मुद्दाम इतकी धडपड करून खऱ्याखोट्या कारणांनीं पॅरोलवर सुटका करून घेऊन तुला भेटायला आलों, तो कां आलों तुला माहीत आहे शकू ? तुझ्यासाठीं आलों मी, तुझी क्षमा मागून पुन्हां ह्या ज्योतीच्या प्रकाशानें माझा संसार उजळता करण्याच्या इराद्यानें आलों आहें मी. आजवर तुझें जीवन दुःखी होईल अशा चुका माझ्या हातून झाल्या. "

" त्या चुका पुन्हां हातून होऊं द्यायच्या नाहींत. "

" नाहींत. "

" त्यांत जीवन वनवासी तुमचेंही होईल व माझेंही होईल. "

" होय. म्हणूनच आपला वनवास आपण संपवूंया. "

" संपवूंया. कां म्हणून राहावें आपण हट्टानें सदोदित तापल्या तव्यावर उभें ? तुमच्या सदिच्छेचें मी स्वागत करत्यें. "

इतक्यांत दुरून जहांगीरशेट व रावसाहेब उद्धवराव जोशी बंगल्यासमोरच्या मोठ्या बागेपलीकडच्या रस्त्यावर मोटार उभी करून बोलत येतांना त्या दोघांना दिसले.

" हे कधीं आले मुंबईला ? कशाला आले ? आणि इथें ? दयान तर यांना माझा पत्ता सांगितला नसेल ना ? " असें स्वतःच्या मनाशीं म्हणत

जयंत जोशी त्या दोघांना टाळण्यासाठीं शकुंतलाला म्हणाले, "चल, आपण जरा बागेंत जाऊं."

"चला. आपण झोंपडीकडे जाऊं." शकुंतला म्हणाली. स्वतःच्या जीवननिर्धारावर यशस्वितेचा अखेरचा कळस ठेवण्याची वेळ जवळ आली आहे या अनाहूत जाणिवेनें ती किंचित् बावचळल्यासारखी झाली होती.

दोघेंही बागेंतून मागील रस्त्यानें झोंपडीकडे निघालीं. शकुंतला पुढें चालत होती; जयंत जोशी तिच्या मागोमाग चालत होते.

"बाई ! धनी आले कीं ! चाललां कां ?" सोमनाथ शेतांत भाजी-पाल्याचे वाफे बेणीत होता तो शकुंतलाला पाहून म्हणाला.

तेवढ्यांत त्याची तिच्या मागोमाग चालत असलेल्या जयंत जोशींकडे नजर गेली. त्यासरसा तो ओशाळल्यासारखा झाला. मान खालीं घालून कामाला लागला.

"अरे, येत्यें मी आतां सोमनाथ ! जात नाहीं कुठें. जाईला घेऊन येत्यें."

शकुंतला आपली गोड फसवणूक करीत आहे हें सोमनाथनें तेव्हांच ओळखलें. पण तो कांहीं बोलला नाहीं. उलट तें दृश्य पाहून त्याला मनांतल्या मनांत समाधान वाटलें, कीं यांचा सोन्यासारखा विजोड संसार सोन्याचा होतो आहे, होऊं द्या.

जें व्हावेंसें वाटत होतें, तें शकुंतला, जयंत जोशी व सोमनाथ या तिघांच्याही मतें त्या शुभ क्षणीं अचानक होत होतें.

त्रिकोणाच्या तीन कोनांचा संधि झालेला पाहण्यासाठीं तिघेंही आतुर होतीं. तिघांच्याही मनांतील हुरूप समोरच्या व सभोंवारच्या सृष्टींत ओसंडत होता.

## २

जाई आपल्या झोंपडीकडे आली ती सुखकर दिवास्वप्नें पाहत आली. जयंत जोशी कसे झाले तरी तिचे ऋणानुबंधी होते. ती त्यांना आपले बंधू मानी;

त्यांच्या आईला आई मानी. सन १९३४ सालीं येरवड्यांत गांधीजींनीं हरिजनोद्धारासाठीं प्राणांतिक उपास आरंभिला, तेव्हां जयंत जोशींच्या गांधीभक्त मातुश्रींनीं अस्पृश्योद्धाराची शपथ घेतली ती जाईला समोर ठेवून. जयंत जोशी तेव्हां येरवड्याच्या तुरुंगांत गांधीजींच्या असहकारिता चळवळींतील स्थानबद्ध म्हणून होते.

जयंत जोशी आणि शकुंतला यांच्या विस्कटलेल्या संसाराची घडी पुन्हां नीट बसावी अशी सदिच्छा बाळगणारांपैकीं जाई होती, जाईचा बाप सोमनाथ होता, आणि जहांगीरशेटही होते.

जयंत जोशी अचानक आले, तेव्हांच 'ता' म्हणतां 'ताकभात' सर्वांनीं ओळखला होता. आणि आपापल्या परीनें मनांतून निश्चय केला होता कीं काय पाहिजे तें झालें तरी शकुंतलाचा मोडलेला संसार पुन्हां जोडला जाईल असें करायचें.

जहांगीरशेट बाहेर कसल्या तरी कामाला गेले असतांना त्यांच्या बंगल्यांत शकुंतला व जयंत जोशी या नवराबायकोची एकदां एकांतांत मनमोकळेपणानें गांठ पडण्याचा योग आला, तो योग जुळवून आणण्याचें पुण्य आपणाला लाभलें, याचा डोंगराएवढा आनंद लीलेनें शिरावर उचलून घेऊन अशोकशीं बोबड्या गोष्टी करीत जाई आपल्या झोंपडीपाशीं आली. तों तिचे शेतकरी शेजारी स्त्री-पुरुष तिची झोंपडी फुलांच्या माळांनीं व लतापल्लवांनीं सुशोभित करण्यांत गर्क असलेलीं तिला दिसलीं.

तिनें समोर पाहिलें. तों कोंडीच्या-आपल्या आईच्या-नांवानें जहांगीर-शेटनीं बांधलेल्या तुळशीवृंदावनासभोंवार सारवून कणारांगोळी काढण्यांत व फुलांच्या माळांनीं तें वृंदावन शृंगारण्यांत घोंडी पुरी पुरी रंगून गेली होती.

आणि झोंपडींतही बायकांची गर्दी कांहीं कमी नव्हती.

जाईच्या सावत्र आईला-घोंडीला आज शेतावरील सर्व मंडळींनीं आणि त्यांच्या मार्फत जहांगीरशेटजींनींही डोहाळेजेवण करायचें ठरविलें होतें. सोमनाथचे एकवीस सालापासूनचे लंगोटीयार मित्र जे परिस्थितीच्या आघातांत गोते खात खात आजवर कोणत्या ना कोणत्या स्थितींत टिकाव धरून जिवंत होते, ते बहुतेक आज सोमनाथच्या आमंत्रणावरून तिथें आले होते व येत होते.

त्या साऱ्या लोकांनीं जाईच्या झोंपडीसमोर कौंडीच्या वृंदावनापावेतों मारे लतापल्लव व फुलमाळा टांगून खूप सजावट करण्याचा सपाटा चालविला होता.

जाईनें पाहिलें, तिथें रावणाऱ्या मंडळींत शेख मिरा व लालजी हे दोघेही होते.

"यांना कुणीं बोलावलें ?" जाईनें तोरणें टांगण्यांत रंगून गेलेल्या चमेलीखानाला विचारलें, "काय रे ? हे लोक कसे आले इथें ? परवां मीं ऐकलें कीं एकमेकांचीं डोचकीं फोडायला उठावे जसे कांहीं, इतके वर्दळीवर आले होते. आणि आज इथें पाहत्यें तर—"

"जा ! जा ! जरा चा कर जा आम्हां सगळ्यांसाठीं. फुकटची तोंड-पाटीलकी करीत उभी नकोस राहूं." लालजी जाईकडे वळून पाहत सर्वांकडे एकवार भिरभिरती नजर फेकीत म्हणाला, "आजकाल माणसें नुसतीं बोलघेवडीं बनूं लागलीं आहेत. आपणाला नाहीं बुवा हा बोलघेवडे-पणा आवडत. भटाळलेलीं माणसें अशींच !..."

बोलतां बोलतां उजव्या डोळ्याच्या कोंपऱ्यांतून मिस्किलपणें शेख मिरानें जाईकडे पाहिलें.

"बरें ! बरें ! देईन याचें उत्तर." जाई अनुरागपूर्वक मान हेलावीत शेख मिराकडे व लालजीकडे त्याच्यासारखीच पण डाव्या डोळ्याच्या कोंपऱ्यांतून जरा रागीट मुद्रेनें पाहत उद्गारली, "भटाळलेलीं खरीं आम्ही. पण म्हणून काय कांहीं कांहीं माणसें होतात तशीं गिरणीवाल्या गब्रूच्या पोरीच्या हातचीं पोतेरीं झालों नाहीं !"

"आणि पोतेरें कोण झाला ? गिरणीमालकाची पोर सांगेल तसा कोण वागतो ? नाचवील तसा कोण नाचतो ?" चमेलीखानानें मध्येंच हळूच शेख मिराला चिमटा घेत विचारलें, "आहे का रे कोणी असा आपल्यांत ? कोण असेल त्यानें हात वर करावा."

कोणींही हात वर केला नाहीं.

"काय, कोणीही नाहीं ?" शेख मिरानें उसनें गांभीर्य चर्येवर आणीत सर्व मंडळीकडे न्याहाळीत भुंवया चढवीत विचारलें, "मग काय, आमची जाई बोलली तें सारें चुकीचें ?"

जाई त्या मंडळीला गप्पागोष्टींत रंगू देऊन झोंपडीकडे चहा करायला जाते, तोंच घोंडी सर्वांचें संभाषण ऐकून हळूच कामांतून काढता पाय घेऊन झोंपडींत जाऊन चहाच्या तयारीला लागली होती.

" अग ए घोंडे ! अग तुला डोहाळे जेवण, आन् तूंच आम्हांला चहा करून पाजणार ? " झोंपडीसमोर आंब्याच्या डहाळ्यांचीं तोरणें गुंफीत बसलेल्या बायकांपैकीं एकजण बाकीच्या सोबतिणींकडे नजर फेंकीत म्हणाली.

सर्वजणी एकमेकींकडे डोळे मोडून पाहूं लागल्या.

" निजला वाटतें हा ! " जाई अंगावरच्या अशोकाची बाळचर्या अवलोकन करीत म्हणाली, आणि झोंपडींत एक स्वच्छसें गोधडीचें फटकूर आंथरून त्यावर त्याला ठेवून हळू हळू थोपटूं लागली.

" अग ! त्याची आई कुठें गेली ? " घोंडीनें चुलीवरच्या चहाच्या पाण्याच्या पातेल्यांत चमच्यांनीं साखर मोजून टाकीत व मनांतून चहा पिणाऱ्या माणसांची गणती करीत म्हटलें.

इकडे शेख मिरा, लालजी, चमेलीखान वगैरेंच्या गप्पागोष्टी अगदीं रंगांत येत होत्या. तिकडून सोमनाथ त्या मंडळींत आला. तेव्हां गंगेला जणूं यमुना येऊन मिळाली.

" अग मावशी ! बाईचा नवरा आला आहे. " जाई हळूच घोंडीच्या कानाशीं लागून म्हणाली.

" आला आहे ? जयंत जोशी ? " घोंडीनें चूल फुंकतां फुंकतां मागें वळून पाहत विचारलें.

" होय. आन् त्याचा म्हाताराही आला आहे. "

" कोण, तो वकील ? यांचें घरदार सारें मुळशीच्या धरणांत बुचकळून खाऊन टाकणारा वकील ? " घोंडीनें चुलींतलीं लाकडें पुढें सारीत विचारलें.

तोंच सोमनाथ आपल्या सौंगड्यांना चहा पिण्यासाठीं झोंपडींत घेऊन आला. गप्पागोष्टी अगदीं रंगांत आल्या होत्या.

" काय, काय म्हणालीस घोंडे आतां ? " सोमनाथनें घोंडीच्या तोंडचे शब्द ओझरते ऐकून म्हटलें, " हें बघ, असें दुसऱ्यांच्या नांवानें बोटें मोडणें सोडून द्यावें आपण. एका हाताचीं पांची बोटें कांहीं सारखीं

नसतात. माणसांमाणसांत डावा उजवा फरक हा असायचाच."

"आतां कसें बरें बोललास सोमा तूं!" लालजी सोमनाथला पाठिंबा देत म्हणाला.

"आमच्यांतल्या ह्या दोघांना गांधीबाबा झाला आहे. त्या झपाटण्यांतून हे कांहीं बरे होत नाहींत अजून." शेख मिरा सर्व मंडळीकडे धांवती नजर फेकीत म्हणाला, "आतां पाल आणि विंचू यांचा संसार कसा काय शोभतो पाहूंया."

"पण विंचू पालीबरोबर संसार करणार तरी का?" एकजण म्हणाला.

"पाल विंचवाबरोबर संसार करणार का, असें विचार." दुसरा म्हणाला.

लालजी कधीं चिडणारा नव्हे. पण चिडलाही नाहीं. पण सौम्य, समजुतीच्या शब्दांत त्यानें आपल्या सर्व सहकाऱ्यांना सुचविलें, कीं प्रत्येक विषय असा थट्टामस्करीचा विषय बनवणें बरें नव्हे.

"बरें बाबा! यापुढें आम्ही नाहीं तुझी अशी थट्टामस्करी करणार. मग तर झालें?" एकाच्या तोंडून उद्गार निघाले.

त्या सामुदायिक थट्टामस्करीचा रोख सर्वांना परिचित होता. तसें पाहूं जातां त्या गोष्टींत गुप्त कांहीं नव्हतें. उलट अस्थानीं गुप्तता निष्कारण गैरसमजांना कारण होते, म्हणून तर लालजी व चित्राबेन यांनीं त्या आपल्या साऱ्या मित्रांना विचारून निर्णय घेतला होता कीं जगाच्या तोंडाला हात लावीत बसण्यापेक्षां आपण लग्न करून जगाशीं मिळतें घेणें चांगलें.

त्याप्रमाणें दोघांच्या लग्नाची रीतसर नोटीस नुक्तीच चार दिवसांपूर्वी दिली गेली होती.

आतां पुष्कळ ठिकाणीं तोच एक चर्चेचा विषय होऊन बसला होता.

सोमनाथाचें त्या थट्टामस्करींत अंग नव्हतें. घोंडीनें बोलण्याच्या ओघासरसा काढलेला त्याच्या अर्थसर्वस्वाच्या विध्वंसाचा मुद्दा त्याच्या मस्तकांत जोरानें घोळूं लागला होता.

"पण! मला सांग तूं, घोंडी आतां बोलली त्यांत काय चूक आहे रे? तुझें घरदार मुळशीच्या धरणांत बुचकळून त्या वकिलानें खाऊन

टाकलें नाहीं ? अगदीं खरें खरें सांग. जाईच्या गळ्याची आण आहे तुला...” शेख मिरा म्हणाला.

जाई त्यावर कांहीं तरी बोलणार म्हणून चर्या फुलवते, तोंच अगदीं दुरून तिला ती अनपेक्षित साद ऐकूं आली, “ जाई ! ”

जाईनें झोंपडींतून बाहेर येऊन आजूबाजूला नजर फेंकून पाहिलें. हांकेची ओळख तिला पटली. पण हांक ऐकून आनंदाची–हुरूपाची हिरवळ तिच्या अंतःकरणावर मखमालीसारखी उगवली नाहीं. राखेखालीं झांकल्या गेलेल्या निखाऱ्यावर फुंकर पडतांच त्याची धग जाणवूं लागावी, तसें तिचें चित्त एकाएकीं अस्वस्थ झालें.

‘ छे ! फकिराची हांक नसेल पण ती. पिसाळलेल्या कुत्र्यासारखा भकलेला भरकटलेला माणूस तो. तो इकडे कसा येईल ? त्याला काय जाईचा सुरीच्या पात्यासारखा स्वभाव माहीत नाहीं ? एकदां सांगितलें त्याला मीं, मला तूं मेलास आणि तुला मी मेल्यें म्हणून. तरी देखील लोंचटासारखा कशाला येईल इथें मरायला ?... त्याची नसेलच ती हांक. दुसऱ्या कुणाची तरी असेल.’ अशी आपल्या मनाची फसवी समजूत करीत जाई हांकेच्या अनुरोधानें दूरवर नजर फेंकून पाहते, तों डोकीवर लाल गोंडेदार फेजटोपी, अंगांत सद्रा व त्यावर जाकीट, लुंगी नेसलेला, हनुवटीच्या टोंकावर थोडी दाढी वाढलेली आहे, असा तरुण मुसलमान पलीकडे कुंदाच्या जाळीआड उभा असलेला तिला दिसला.

‘ फकिराच का हा ? ’ असें स्वतःशीं विचारीत तिनें स्वतःच स्वतःला धमकावलें, ‘ छे ! फकिरा नव्हे हा. फकिरा इतका नरकांत कुजणारा किडा नाहींच. ’

स्वतःच्या नजरेची फसवणूक व्हावी या इच्छेनें जाई त्या माणसाकडे पाहत त्याच्या रोखानें पुढें जाऊं लागली.

‘ हा फकिरा नाहीं, हा फकिरा नाहीं. ’ असें स्वतःला बजावीत पण हा फकिराच असेल या वाढत्या भीतीनें ती बावरत तडफडत एकेक पाऊल पुढें टाकीत होती.

# ४

कोणाचेंही जाई कुठें जाते, काय करते, इकडे लक्ष नव्हतें. कारण एक तर धोंडीच्या चुलीवर चहा तयार होत होता, आणि दुसरें, विषय बोलतां बोलतां सहज प्रसंगानुसार निघाला तोही सर्वांच्या जिव्हाळ्याचा. त्यांतूनही त्या विषयाची जितकी उमज सर्वांना सहजगत्या पडली नसती, तितकी समजूतदारपणें ओळख पाडून देणारा शेख मिरा तिथें होता. आपल्या गोरगरीब शेतकरीकामकरी बांधवांच्या डोक्यांत समाजवादी विचारसरणीचा प्रकाश पाडण्याची जराशी संधि मिळाली तरी ती तो घायां दवडीत नसे.

" आमच्या सोमासारखी 'खाना पीना मजा करना' वाल्या लोकांच्या ख्यालीखुशालीसाठीं स्वतःच्या उभ्या आयुष्याची उदबत्ती करून जाळायची तुम्हां आम्हां अर्धपोटी उपाशीं–तापाशीं राबणाऱ्या कष्टाळू गोरगरिबांची तयारी आहे ! " शेख मिरानें वीरासन घालून टेकलेल्या गुडघ्यावर आधारून ताठ पाठीनें मान उंचावून पाहतां पाहतां विचारलें.

सर्वांच्या माना नकारार्थानें डोलूं लागल्या.

" तर मग युद्धाच्या कामांत सरकारला मदत करा. सैन्य पुरवा. पैसा पुरवा. हेंच ना तुझें म्हणणें ! "

" पण आपली कॉंग्रेस व आपला गांधीबाबा काय सांगतो बरें ? " मध्येंच सोमनाथनें विचारलें.

विरोधी वातावरण निर्माण करण्यासाठीं आपण आपल्या बिनतोड विचार-सरणीचा एवढा झंझावात सोडला असतांना देखील त्या झंझावातांतून न विझतां सौम्य प्रकाशानें कांपत कांपत तेवणारी ज्योत सोमनाथच्याच वाणीनें प्रज्वलित करावी, याचें शेख मिराला नवल वाटलें.

" अरे मिरा ! काय लागतोस तूं त्यांच्या नादाला ! वकिलानें शेत-वाडीसकट घशांत टाकलें तरी वकिलाच्या दाढेखालून चेंचून चावून खलास होतां होतां 'चावायला त्रास होतो का तुला बाबा !' म्हणून वकिलाची कींव करणारे खुळेवेडे संतोबा ते. ते असेच बोलायचे आन् असेच करायचे. " धोंडी चुलीवरचा चहा उतरीत म्हणाली.

" होय. होय. कांहीं झालें तरी आम्ही असेच बोलायचे आन् असेच करायचे. कॉंग्रेसची आन् गांधीबाबाची आण मोडून पुढें जायचे नाहीं आम्ही." सोमनाथ आजच्या सोहळयासाठीं शेटजींच्या सांगण्यावरून गोळा करून आणलेल्या कपबशा चहासाठीं धोंडीपुढें मांडीत म्हणाला.

" समुद्रांत बुड्या मारून कोरडा ठणठणीत म्हणतात ना ? तशी गत आहे तुझ्या सोमाची, धोंडे ! असला गांधीखुळा माणूस मी साऱ्या हयातींत दुसरा पाहिला नाहीं." शेख मिरा म्हणाला.

" अजून तुझी हयात पुष्कळ जायची आहे मिरा ! पुष्कळ पावसाळे बघायचे आहेत तुला आमच्यापेक्षां." सोमनाथ धोंडीनें ओतलेल्या चहाचा एकेक पेला एकेकापुढें सरकवीत म्हणाला.

त्या सर्वांत शेख मिरा व लालजी हे दोघे जाणते. ते असें कांहीं उद्‌बोधक बोलूं लागले, कीं बाकीच्या साऱ्यांनीं श्रद्धापूर्वक पोथीपुराण ऐकावें तसें ऐकत बसावें, हा नेहमींचाच परिपाठ.

" भाई हो ! आपली कमालीची जाचणूक होते हें अगदीं खरें आहे—"

लालजीला तोंडचें वाक्य पुरतें बोलूं न देतां शेख मिरा मध्येंच म्हणाला, " म्हणतात ना ? ' पाण्यामध्यें मासा, नीज घेई कैसा ? । जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे ॥ ' लालजी ! तुझे हे हितोपदेश आणि शांतिपाठ आम्हां गोरगरिबांच्या, कष्टकऱ्यांच्या हिताचे नाहींत. "

" मग काय, गांधीजींची शिकवणूक तुम्हां कष्टकरी लोकांच्या हिताला बाधणारी आहे असें तुला म्हणायचें आहे ? कॉंग्रेसची सध्यां चाललेली चळवळ गोरगरिबांच्या हिताची नाहीं ? "

" नाहीं. "

" नाहीं ? शेख मिरा, विचार करून बोल. गांधीजींवर तुझा विश्वास नाहीं ? कॉंग्रेसवर तुझा विश्वास नाहीं ? तुम्हीं लोकांनीं—तुम्ही भारत-मातेच्या कोटमाप शेतकरी—कामकरी, कष्टाळू गोरगरिबांनीं आपल्या रक्ताची पावळी आणि मांसाचा चिखल करून जी चळवळ आजवर पोसली, वाढविली, एवढ्या नांवारूपाला आणली, त्या चळवळीवर तुझा विश्वास नाहीं ? "

" तूं गांधीजींविषयीं बोलशील, तर त्या महात्म्यापुढें मी एकदां सोडून शंभरदां लोटांगणें घालीन.—"

"अरे, पण हें कांहीं तूं खऱ्या हाडाच्या कम्युनिस्टासारखें बोलत नाहींस शेख मिरा! गांधीजींना नावें ठेवीत नाहीं तो खरा कम्युनिस्टच नव्हे."

"आणि गांधीजींविषयीं चांगलें बोलणारे, गांधीजींचे चेले म्हणविणारे, ते सारे गांधीवादी असतातच असेंही नव्हे." शेख मिरा जशास तसें या न्यायानें रोखठोक भाषेत म्हणाला, "तसें पाहिलें तर आम्ही कम्युनिस्टच गांधींचे खरे प्रामाणिक वारस आहों." लालजी एकदम चमकल्यासारखा आपणाकडे पाहूं लागला आहे हें ध्यानीं घेऊन त्यानें पुढें म्हटलें, "गांधींचा वारसा म्हणजे त्यांनीं जमा केलेल्या टिळक कोटी फंडाचा किंवा उभारलेल्या आश्रमाचा, हरिजन-सेवकसंघांसारख्या उमाप संस्थांचा नव्हे. त्यांवर वारसा गांधींचे चेले म्हणविणारांचा, आमचा नाहीं. वारसा शिकवणुकीचा म्हणतों मी. गांधींनाही देशांतीलच नव्हे, तर साऱ्या जगांतील दरिद्रीनारायणांचें दारिद्र्य दूर करायचें आहे, आणि कम्युनिस्टांनादेखील तेंच करायचें आहे. समाजांत एका टोंकाला गोरगरिबांच्या निढळाच्या घामांतून निर्माण झालेल्या संपत्तीचे पर्वत सांचलेले असायचे, त्यांवर मूठभर धनकुबेर अरेराव आयत्या बिळांतील नागोबांसारखे आरामांत मांडी घालून बसलेले असायचे, आणि दुसऱ्या बाजूला ती संपत्ति निर्माण करणाऱ्या तुमच्या आमच्यासारख्या कोटमाप अर्धपोटी, उपाशी, रात्रंदिवस मरेमरेतों राबून संपत्ति निर्माण करणाऱ्या गोरगरीब कष्टाळूंच्या भिकार अर्धपोटीं उपाशीं आयुष्याची खाई पिचत असायची. असली दैना समाजांत गांधींनाही नको आहे, आणि कम्युनिस्टांनाही नको आहे."

"हिंसा कम्युनिस्टांना हवी आहे. गांधीजींना हे सारे जीवनमरणाचे प्रश्न खेळीमेळीनें, तडजोडीनें, गुण्यागोविंदानें सोडवायचे आहेत. तुम्ही कम्युनिस्ट लोक गांधीजींच्या नांवानें ओरडतां—"

"जरूर ओरडतों. एकदां सोडून शंभरदां ओरडतों."

"ते कां मग?"

"कां मग? आमचे शत्रू—शेतकरी—कामगारांच्या जागरूकपणाच्या चळवळीमुळें गांगरलेले गारठलेले साप—गांधीजींपासून अभय मिळवून त्यांच्या उबाऱ्याला सुरक्षित असतात. गांधींच्या नांवामागें त्यांना लपायला सांपडतें. म्हणून आमचा गांधींवर राग."

" म्हणजे तुझें म्हणणें काय, शेख मिरा? गांधी या श्रीमंत लोकांना, जमीनदारांना, कारखानदारांना मुद्दाम अभय देतात? तुमची आमची पिळणूक करायला त्यांना हमरस्ता मोकळा असावा म्हणून? भांडवलशाही-धार्जिणेपणाचा आरोप तुम्ही गांधींवर करतां?—"

" होय. करतों. कारण आज ह्या जमीनदारांना आणि भांडवलदारांना गांधींखेरीज भरभक्कम आधार दुसऱ्या कुणाचा आहे? मला सांग पाहूं!"

" असें पाहा शेख मिरा, जगांत माणसांना माणसांसारखें जगायचा हक्क सगळ्यांना सारखाच आहे."

" पण माणसांना आहे तो. आणि माणसांसारखें जगायचा. गांधी बिचारा देवमाणूस आहे. भोळा. त्याला वाटतें कीं सारे लोक आपणा-सारखेच सरळ असतात. प्रामाणिक असतात."

" माणसाच्या ठायींच्या माणुसकीवर त्यांचा विश्वास असतो."

" होय. असतो. आणि वरवर माणसासारखे दिसणारे भयंकर प्राणी त्या विश्वासाचा लांडग्यांनीं मेंढ्यांच्या कातड्याचा उपयोग करावा तसा फसवेगिरीकडे उपयोग करतात.—पाहतोस काय असा माझ्याकडे टक लावून सोमा तूं? खुळया शेतकऱ्या! मुळशीच्या धरणांत तुझी घरदार-शेतवाडी गाडली गेली, ती कशासाठीं?"

" माझ्या जमिनीसाठीं मी लढलों." सोमनाथ इतका वेळ अगदीं स्तब्धपणें त्या दोघांचें संभाषण ऐकत होता तो म्हणाला, " गांधीबाबाच्या हुकुमासारखे आम्ही सारे शेतकरी लढलों. आम्हीं कांहीं चूक केली नाहीं."

" पण चूक केली नाहीं तरी चुकीची सजा तर भोगावी लागली ना तुम्हांला? आणि भोगावी लागते आहे?" शेख मिरा म्हणाला.

" भिकेला आम्ही लागलों, आन् आमचे खटलेखोकले लढवून गब्बर झालेला वकील आज राजावाणी ऐषआराम भोगतो आहे. माहीत आहे तुम्हांला?" सोमनाथकडे बोट करून घोंडी म्हणाली, " सांगितलें आहे यांनीं कधीं? विचारा यांना खरें कीं खोटें? बिचारा शेतकरी! निम्मा गाडला गेला धरणांत. राहिलेला निम्मा गाडला गेला वकिलाच्या वकिली आन् सावकारी डबऱ्यांत."

" होय!" एकजण शेतकरी इतका वेळ अगदीं एका बाजूला बसला

होता, तो घोंगडी सरसावीत हातांतील पेटती विडी बाजूला ठेवीत पुढें सरसावून म्हणाला, " होय बाबा ! आम्ही मरणारे मर मर मेलों. मरतों. ते आम्ही घांसभर अन्नाच्या गोळ्याला आन् लाज झांकायसाठीं हातभर सुडक्याला महाग."

" आन् तुमच्या आमच्या मुडद्यांवर गव्रूंचे कारखाने उभारत आहेत, हवेल्या उठत आहेत, मोटारी धांवत आहेत, मोरे ऐषआराम चालले आहेत ! काय राम उरला नाय गांधीबाबाच्या चळवळींत आतां. काँग्रेस-साठीं हे लोक गोरगरीब हजारांनीं मेले, लाखांनीं तुरुंगांत गेले, हाल भोगले, बायकापोरांना अन्नाला महाग केलें, त्या काँग्रेसनें आमच्यासाठीं काय केलें ?"

शेख मिरा संताप मनांतल्या मनांत दाबीत दांतओंठ चावीत म्हणाला, " आणि आम्ही लढाई नको म्हणतों म्हणून हे काँग्रेसचे लोक आमच्यावर चिडतात. दांतओंठ खातात. अरे बाबांनो ! जरा डोळे उघडा !—ती माझी मायमाउली इथें आली असती तर तिला विचारलें असतें मीं, कीं आज लढाई नको म्हणायचें आन् काय साधायचें ?"

" एका दिवसांत एका घटकेंत जग आणि आपला देश असा झपाट्यानें कधीं सुधारणार आहे का ? गड्यांनो ! अनेक शेंकड्यांच्या, अनेक हजारांच्या वर्षांगणतीचे जुलुमजबरदस्तीचे डोंगर आपणां कोटमाप गोरगरिबांच्या डोक्यावर उभे आहेत. ते असे फुंकरीसरसे नाहींसे करतां येणार आहेत का ? आपण मरूं, आपण मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं म्हणतात. आपण मरतों आणि मरूं तें कांहीं वायां जाणार नाहीं. आपण नाहीं तरी आपलीं मुलेंबाळें तरी या जगांत सुखानें जगतील कीं ! नाहीं लालजीबाबा ?" सोमनाथानें चहाचा शेवटचा घोट घेऊन कप रिकामा करतां करतां विचारलें.

" तें कांहीं नाहीं तुमचें आमचें या बाबतींत कधीं पटणार नाहीं. आपण पुन्हां कधीं असल्या गोष्टीवर वाद घालायचा नाहीं." शेख मिरा म्हणाला.

लालजी म्हणाला, " असें पहा, गड्यांनो, आपला मतभेद अगदीं थोडा आहे. गंगायमुना दुथडी भरून वहात आहेत. कांठचे प्रांत सुपीक

होऊन धनधान्यांनीं बहरत आहेत. शेत गंगेच्या पाण्यावर पोसलेलें असो कीं यमुनेच्या पाण्यावर पोसलेलें असो—सर्वांच्या मुखीं पोटभर अन्न लागलें म्हणजे झालें. तें आज ना उद्यां लागणार खास. आणि आज ना उद्यां पहाशील तूं शेख मिरा, कीं या गंगा–यमुनांचा संगम झाला आहे,—"

" संगम होईल; पण केव्हां होईल ? वाघ, लांडगे आपली आधाशी, हिंसक, शिकारी वृत्ति सोडतील तेव्हां. " शेख मिरा म्हणाला, " असें कधीं होईल ? "

" तूं म्हणतोस ते वाघ सिंह मला समजले—"

लालजीच्या तोंडचें वाक्य पुरें होण्याआधींच तिथें जमलेल्या शेतकऱ्यांपैकीं तीनचार जण एकदम म्हणाले, " आम्हांलाही समजले. "

" आपणां सर्वांनाच हें समजतें. मोठे लोक समजतात तितके आपण कांहीं अडाणी नाहीं. गांधीबाबा सांगतात तशी आमची देखील इच्छा आहे, कीं जगांत सगळ्यांनीं जगावें. सगळीं आपण देवाचीं लेकरें आहोंत. देवाच्या जगांत जगायचा सर्वांना अधिकार आहे. सगळ्यांनीं जगावें आणि इतरांना जगूं द्यावें. " लालजी म्हणाला.

" पण असें कधीं शक्य आहे ? पिळणूक करणारांचें मन असें कधीं पालटणें शक्य आहे ? " शेख मिरानें विचारलें.

" शक्य आहे; अगदीं शक्य आहे ! जगांत आरंभीं कुठें कोण कुणाला पिळीत होता ? सगळे कसे अगदीं गुण्यागोविंदानें रहात होते. "

" अरे लालजी, पण तो काळ गेला आतां. भूतकाळांत जमा झालेल्या गोष्टी वर्तमानकाळांत आणि भविष्यकाळांत जीवनाच्या धकाधकीच्या मामल्यांत थोड्याच उपयोगीं पडतात ? माणसानें नेहमीं, वर्तमानकाळाकडून भविष्यकाळाकडे नजर ठेवावी. भूतकाळाच्या खोडाखोडींत स्वतःला कधींही अडकवून घेऊं नये. "

" पण काळोखांतून वाट चालतांना भूतकाळाच्या इतिहासाचा दिवा तर आपणाला उजेड द्यायला उपयोगीं पडतोच कीं नाहीं ? भूतकाळांत जें जें चांगलें होतें, तें तें आपण जरूर घेतलें पाहिजे. तुम्ही तरी काय हें जग भूतकाळांत उत्पन्न झालें म्हणून तें फेकून थोडेंच देणार आहांत ? याच जगांत आपल्याला रहायचें आहे. हेंच जग आपणाला सुधारायचें आहे.

याच जगांत आपणाला माणुसकीला जागून सर्वांशीं खेळीमेळीनें वागून, एकमेकांच्या मदतीनें कष्ट करून सुखी व्हायचें आहे. आपले जमीनदार, भांडवलदार असे पुंजीवादी लोक आज वाट चुकत असले तरी ते आपलेच आहेत. आपण त्यांना त्यांच्या चुका सुधारायला लावल्या पाहिजेत. त्यांना केल्या पापाची फेड करण्यासाठीं संधि दिली पाहिजे."

"पण लालजी, तुझ्या गांधीबाबांना असें विचार, कीं तुम्ही सांगतां तशी संधि जगानें या जमीनदार, भांडवलदार, पुंजीपतींना दिली, म्हणून यांची सुधारणा होणार आहे का? यांचा स्वभाव पालटणार आहे? वाघ, लांडगे स्वतःच्या ठायींचा हिंसकपणा सोडून असे गांधीबाबा सांगतात त्याप्रमाणें गुण्यागोविंदानें वागूं लागणार आहेत? गांधीबाबांची विश्वस्त ऊर्फ पालक लोकांची कल्पना सोन्याच्या भरजरी दोरासारखी आहे खरी–"

"हा भरजरी दोर आपण पुंजीपतींच्या हातीं देऊन त्या दोराच्या आधारानें त्यांना पिळणूकदारीच्या खोल गर्तेतून वर आम्हा कोटमाप गरीब रयतेंत येऊन उभें रहातां येईल."

"पण—"

"तुझी शंका ध्यानीं आली शेख मिरा; पण जगाच्या राहाटींत असल्या पण आणि परंतूची अडगळ मानवजातीची प्रगति यापुढें थांबवूं शकणार नाहीं. आपण अथवा गांधीजी त्या पुंजीपतींना हा भरजरी दोर देतों आहोंत. त्या दोराचा वर येण्यासाठीं त्यांनीं उपयोग करून घेतला नाहीं, इतका समंजसपणा त्यांच्या ठायीं याउप्परही आला नाहीं, तर त्याच दोराचा फांस करून ते आपल्या मानेसभोंवार आवळून घेत आहेत असा त्याचा अर्थ होईल. आपल्या हातांनीं आपल्या कर्मानें ते फांशीं जातील. आपला आपण नाश करून घेतील. त्याला कोण काय करणार?"

तिथें जमलेले सर्व शेतकरी किंचित् बावरल्यासारखे करून सभोंवार टकमक पाहूं लागले. ते जरी फार शिकलेले नव्हते तरी त्यांना या सर्व विचारांची जहांगीरशेटजीच्या सहवासांत अलीकडे चांगली ओळख झाली होती. जें लालजी बोलला तें पुष्कळदां जहांगीरशेटही बोलले. गांधींच्या

शिकवणींतदेखील पुंजीवादाला अखेरपावेतों थारा नाहीं, हें त्या लोकांना बरेंचसें कळत होतें. कम्युनिस्ट देखील हेंच सांगत.

"काय रे, मग कम्युनिस्ट सांगतात त्यांत आणि गांधीबाबा सांगतात त्यांत फरक तर कांहींच दिसत नाहीं." एकजण दुसऱ्याच्या कानांशीं लागून हळूंच म्हणाला. पण त्यानें त्या बोलणाराला हातानें खुणा करून गप्प रहावयाला सुचवीत, कानात हळूच सांगितलें, "सबूर कर जरा."

"पण लालजी, तूं सांगतोस तसें गांधीजी तर कधींच सांगत नाहींत." शेख मिरा म्हणाला.

लालजीनें हंसतमुखानें विचारलें, "मग तुला काय वाटतें? माणसानें लग्नाचें सामान विकत घेतांना त्या जोडप्याला लागणाऱ्या अखेरच्या सामानाचीही तयारी करावी?"

इतक्यांत जहांगीरशेट व रावसाहेब जोशी बोलत बोलत त्या समारंभाचे जागीं येतांना त्यांना आढळले. त्याबरोबर सर्वांच्या गप्पा संपल्या, आणि जो तो घाईघाईनें त्या दिवशींच्या समारंभाच्या उद्योगाला लागला.

## ५

जाईची शंका अंशतः खरी होती व अंशतः खोटी होती. ती हांक ऐकून पुढें गेली तेव्हां तिला जो मुसलमान तरुण दिसला तो फकिराच होता. पण तिचा फकिरा तिनें पूर्वींच हरवला होता, व तिचा राहिला-साहिला फकिरा आजपावेतों मोतिया मिलच्या संपाबाबत तुरुंगांत गेल्यावर दरम्यानच्या काळांत कुठें तरी हरवला होता तो तिला सांपडत नव्हता. तो हातीं लागावा, पुन्हां सुधारावा आणि आपणाला त्याच्या संगतींत माणसासारखा पुन्हां संसार करतां यावा असं तिला फकिरा बऱ्याच दिवसांपूर्वी तिच्याशीं भांडून निघून गेल्यापासून वाटत होतें.

खरें पाहातां तेव्हां फकिराशीं भांडण स्वतः जाईनेंच उकरून काढलें होतें. तिला तेव्हां फकिराची चीड आली ती बरोबर होती. ज्या महात्मा गांधींनीं भारतांतील कोटमाप अस्पृश्यांचा माणुसकीच्या वाटेनें उद्धार

करण्यासाठीं आपले प्राण पणाला लावले आणि अस्पृश्यांना भारतांत इतर लोकांबरोबर माणसें म्हणून जगण्याचा पहिला दरवाजा उघडून दिला, त्या अस्पृश्यांचा सर्वाधार शोभणाऱ्या महात्मा गांधींवर सन १९३४ सालीं पुण्याच्या नगरपालिकेसमोर बॉंब फेकण्याचा प्रकार व्हावा ही गोष्ट अतिशय लाजिरवाणी तर खरीच. इतर जाणते लोक बोलत त्यावरून जाईला तरी ऐकून माहीत होतें कीं पुण्यांत—गांधीजींवर बॉंब पडावा ही गोष्ट पुण्याच्या आजवरच्या बुरसलेल्या व विखारलेल्या सनातनी वृत्तीला साजेशीच होती. जाईला पूर्वी देखील, म्हणजे गांधीजींवर चौतीस सालीं पुणें नगरपालिकेच्या मानपत्राचा स्वीकार करण्याच्या प्रसंगीं बॉंबफेक करण्याच्या झालेल्या प्रयत्नापासून पुण्याची रहाणी नरकवासापेक्षांही वाईट वाटत असे. लग्न झाल्यावर फकिरा मुंबईत गिरणी कामगार म्हणून राहूं लागला तेव्हांपासून तिचें जीवन जरा दगदगीचें व जिकीरीचें झालें होतें खरें. पण ती म्हणे, कीं दुसरीकडे मला आणखी कितीही हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या तरी चालतील, पण गांधीजींच्या रक्ताची तहान लागलेल्या सनातनी पुण्याचा विटाळ देखील आपल्या जीवनाला उपयोगी नाहीं.

परंतु जाईला जेव्हां कळून आलें कीं पुण्यांत गांधीजींवर बॉंबफेक करणारा अथवा बॉंबफेकीसाठीं गांधीजींच्या सनातनी मारेकऱ्यांच्या हातचें बाहुलें बनलेला साऱ्या मुलुखाचा चांडाळ राक्षस आपला फकिरा आहे, तेव्हां तिच्या मनाला मोठाच धक्का बसला.

वस्तुस्थिति अशी, कीं माशांनीं तरी पाणी सोडून कुठें रहायला जावें ? जाईला तरी आतां विवाहित आयुष्यांत फकिराखेरीज दुसरा कुणाचा आधार होता ?

पण तो आधार तुटेल म्हणून ती भ्याली नाहीं. ती दुर्वार्ता कानीं येतांच फकिराला तिनें तेव्हां खडसून जाब विचारला. फकिरा ती गोष्ट नाकबूल करूं शकला नाहीं. त्याला कारणें होतीं. गरिबीच्या पेटत्या खाईत सांपडलेला तरुण, समाजांत घाणेरडा अस्पृश्य म्हणून पोटापुरत्या काम-धंद्याला, आणि घांसभर अन्नाला देखील महाग झालेला. तशांत देवा-धर्माच्या थोतांडी दांभिक कल्पना त्याच्या डोक्यांत भरवून वर त्याला

थोड्या पैशाची लालूच दाखविणारे गांधीजींचे छुपे सनातनी वर्णाश्रमधर्मी मारेकरी भेटले. तो त्या मोहाला बळी पडला.

पण हा खुलासा तेजस्वी व श्रद्धाळु गांधीनिष्ठ जाईला कसा पटावा ? रागाच्या भरांत तिनें आवेशासरसें लुगड्याच्या पदराच्या टोकानें कपाळाचें कुंकू पुसून टाकलें आणि फकिराला निक्षून सांगितलें, "जा, चालता हो तूं इथून. कर काळें. आजपासून मला तूं मेलास व तुला मी मेलें. माझा फकिरा मेला. गांधीजींच्या जिवावर उठणारा निर्दय लांडगा तूं; तूं माझा फकिरा नव्हेस !"

नुसतें एवढें म्हणूनच जाई थांबली नाहीं. ती तिटकाऱ्यासरशीं बाजूला फकिराच्या नांवानें थुंकून माघारीं झोंपडींत चालली.

कुणीकडून तरी जाईला अडवून घरांत ठेवावें म्हणून गयावया करण्याच्या वृत्तीनें पण दाखवायला हुकमतीच्या शब्दानें तो तिला म्हणाला, "तूं आडव्या सुडक्याची बायकोमाणूस आहेस. जाऊन कुठं जाणार तूं ? माझ्याशिवाय कोण आसरा देणार तुला ?"

जाईच्या ते शब्द वर्मी झोंबले. ती घाईघाईनें झोंपडीकडून माघारीं वळून म्हणाली, "अरे जा, नादान नवऱ्या ! पायीं देखील खोडाबेडी पडल्यासारखें अडून बसायला मी काय कुणा भटाबामणाची किंवा कारकून–मास्तराची बाईल आहें ? पोटासाठीं मांस मला मिळवतां येईल. तुझा पोर मेला तेंही बरें झालें. नाहीं तर गांधीजींच्या–मारेकऱ्याच्या पोराला व्यालेली ही लांवसट म्हणून सारें जग माझ्या तोंडावर थुंकलें असतें. बस्स, आज तुझामाझा संबंध तुटला. फकिराला जाई मेली, आन् जाईला फकिरा मेला..."

# भारतमातेचीं वनवासी लेकरें

त्या दिवशीं याप्रमाणें रागाच्या भरांत फकिराशीं असलेलें बायकोचें नातें ताडकन तोडून जाई त्याच्या झोंपडीबाहेर पडली. तेव्हांपासून आज जवळ जवळ दोन वर्षांनीं तीं दोघें भेटत होतीं. पण फकिराचा मुसलमानी वेष जेव्हां जाईनें पाहिला तेव्हां तिला एकदम वाटलें, कीं उगीच ही पीडा आली मला भेटायला.

" जाई ! " फकिरानें दोन पावलें पुढें येऊन जाईला हांक मारली.

" लांबूनच काय तें बोल. पुढें येऊं नकोस. माझ्यावर विखारलेली सावली पडायला नको. हं ! कशाला आलास ? बोल लवकर. "

" जाई ! तुझा माझ्यावरचा राग गेला नाहीं अजून ? "

" कोण तूं ? "

" तूं मला ओळखत नाहींस जाई ? "

" हा मुसंड्या कोण, मी ओळखीत नाहीं. मला मवाल्याशीं ओळख नको असते. "

" कां बरें ? मुसलमान काय माणसें नसतात ? "

" माझी कल्पना होती कीं तूं ह्या गेल्या दोन वर्षांत सुधारला असशील. माणूस झाला असशील तूं. लोक मला पुष्कळ सांगत कीं फकिरा मुसलमान झाला आहे. तेव्हां मी लोकांवर विश्वास ठेवीत नसें. "

" जाई ! आपणासारख्या महार, मांग, धेड अस्पृश्यांना हिंदुलोक माणसें म्हणून देखील वागवायला तयार नाहींत. मी कामधंदा मिळवण्यासाठीं पुष्कळ धडपडलों. पण गिरणींत संपवाला भांडखोर कामगार म्हणून कुठें थारा मिळेना. इतर कुठें काम शोधलें तर तेंही मिळेना. गांधींनीं हरिजनांचा उद्धार चालवला आहे तो अगदीं फुकट आहे. माझी तरी ठाम खात्री झाली आहे, कीं आम्हां म्हारा–मांगांना यापुढें जगांत जगायचें असेल तर हिंदूंच्या नांवाचा आणि धर्माचा विटाळ नको आमच्या नांवाला. "

" मग काय ? तूं हिंदु नाहींस ? "

" मी माणूस आहे. "

" वीतभर पोटाची खळगी भरण्यासाठीं धर्म बदलणारीं लोकं माणसें नसतात; जनावरें असतात तीं—"

" जाऊं द्या. तूं शिकलेल्या लोकांच्या संगतींत वागून फार शहाणी आणि बोलकी झाली आहेस. मला असला बोलकेपणा नको आहे. एक सांग मला, माझ्याबरोबर यायला तूं राजी आहेस कीं नाहीं ? "

जाई कांहीं न बोलतां दांतांखालीं ओठ चावीत त्याच्या डोळ्याला डोळा भिडवून उभी राहिली.

" जाई ! झालें गेलें आपण विसरून जाऊं. "

" गांधींच्या रक्ताचा घोट घ्यायला निघालेल्या लांडग्याला मी विसरायची नाहीं. "

" तोच तो कोळसा तूं काय जन्मभर उगाळीत बसणार जाई ? आणि तसें पाहिलें तर काय चुकलें ग माझें त्यांत ? पोटासाठीं—ह्या वीतभर पोटांतली भुकेची आग विझवण्यासाठीं माणूस काय काय करतो ? लोकांनीं उगीच एकाला दुसऱ्यांनीं हंसायचें एवढेंच. गांधींच्या जिवावर मी उठलों होतों म्हणून तूं आणि लोक मला नांवें ठेवतात. पण मारेकरी मी झालों, हा देखील पोटाचा एक उद्योगच नाहीं का माझा ? आणि असें बघ, गब्रू गिरणीमालक आमच्या पोटावर लाथ मारून आम्हांला संप करायला लावतात, आमची आणि आमच्या बायकापोरांची उपासमार करतात, म्हणजे ते तरी एक प्रकारचे मारेकरीच नाहींत का ? जाई ! पैसा हें एवढें मोठें जलाल हत्यार आहे, कीं—"

" पुरे कर. पैसा हें अतिशय जलाल हत्यार आहे, पण तें हत्यार आमच्यासारख्या खंबीर मनाच्या माणसावर चालत नाहीं. पैशासाठीं तूं मुसलमान झालास ना ? "

" नाहीं जाई ! मी केवळ पैशासाठीं मुसलमान झालों नाहीं—"

" खबरदार ! तोंडानें एक अक्षर देखील बोलूं नकोस. आमच्या भारतमातेच्या जिवावर उठलेले तुम्ही मुसलमान ! आम्ही सारी रयत देशाच्या स्वातंत्र्याचा लढा लढतों आहोंत. आणि तुम्ही मुसलमान— आतां तूं

माणूस राहिला नाहींस, मुसलमान झाला आहेस. लीगवाला आहेस तूं; खरें ना ? लीगवाले मुसलमान इंग्रजांना फितूर आहेत—" आपल्या शब्दावर फकिरा कांहींतरी बोलूं पहात आहे असें त्याचे ओठ हलूं लागलेले पाहून जाईनें ओळखलें, आणि ती आवेशासरशीं पुढें म्हणाली, "अगदीं तूं एक अक्षर बोलूं नको. मला माहीत आहे सारें. अरे मूर्खांनो, तुम्ही लीगवाले मुसलमान मुल्ला—मौलवींच्या आणि लबाड पुढाऱ्यांच्या नादीं लागून कसे फसतां हें मी जाणतें."

"तुमच्या कॉंग्रेस पुढऱ्यांच्या नादीं लागून तुम्ही लोक कसे फसतां हें अगोदर जाणा. ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी. पुढारी तेवढे इथूनतिथून मतलबसाधू. ते लोकांना फसवायचेच. पण आम्हीं कां फसावें ? आम्हीं कां त्यांच्या जाळ्यांत सांपडावें ?"

इतका वेळ फकिरानें आपल्या मतें सामोपचारानें बोलून जाईचें मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं अशी खात्री होतांच तो एकदम चिडला; आणि करड्या स्वरांत तिला विचारूं लागला, "बस्स ! मला अवांतर गोष्टी नको आहेत. तूं माझी लग्नाची बायको आहेस. माझें सांगणें तूं ऐकलें पाहिजेस. माझ्या नांवरशीचें मंगळसूत्र तूं गळ्यांत बांधतेस—"

जाईनें फकिराला पुढें बोलायला वाव न देतां एकदम आवेशानें गळ्यांतील मंगळसूत्राच्या दोरीला हात घातला, आणि तें एका हिसड्यासरसें तट्कन् तोडून त्याच्या अंगावर फेकून देत म्हटलें, "ही घे तुझी नांवरस ! इतके दिवस अडगळ म्हणून जतन केली होती, ती ही घे तुझी तुला. हीच तुझी माझी फारकत. आतां यापुढें माझा मार्ग मला मोकळा आहे आणि तुझा तुला मोकळा आहे."

त्या शब्दासरशीं चमकत्या विजेसारखी जाई मागच्या पावलीं मागें वळली. पण बहिरीससाण्याच्या तावडींत सांपडलेली पक्षीण ती; अशी सुखासुखीं मोकळी थोडीच सुटणार ?

## २

आतां आपली बायको आपणाला सोडून दुसरा नवरा करील ही कल्पनाही फकिराला सहन होईना. ती आपल्या आवांक्याबाहेर चालली असें पहातांच त्यानें खिशांतून तीक्ष्ण धारेचा खंजीर डोळयाचें पातें लवतें न लवतें तोंच बाहेर काढला, आणि जाईवर वार करणार तोंच रावसाहेब जोशी आणि जहांगीरशेट यांचें शेतांतून येतांना तिकडे लक्ष गेलें.

" कोण आहे तो ? जाई ! कोण ग तो ? तुला ठार मारायला उठला आहे का ? "

विचारपूस करतां करतां ते दोघेही जाई उभी होती तिकडे गेले, तों जाईच माघारी वळून येतांना त्यांना आढळली. फकिरा तसाच्या तसा स्वतःची गुन्हेगारी ध्यानीं घेऊन जीव बचावण्यासाठीं तिथून जीव घेऊन धूम पळाला.

" काय झालें ग जाई ? " रावसाहेब जोशींनीं जाईला विचारलें, " फकिराच ना तो ? तुमचें भांडण झालें का ? "

" जाई यावर कांहीं बोलली नाहीं. ती खवळलेल्या वाघिणीसारखी तेथून झोंपडीकडे चालूं लागली.

" तो जर दिला असाच वरचेवर त्रास देऊं लागला, तर त्याचा बंदोबस्त करावा लागेल. " जहांगीरशेट म्हणाले.

" कांहीं बंदोबस्त करावयाची जरुरी नाहीं. त्याची पुन्हां इकडे यावयाची छाती होणार नाहीं. " जाई म्हणाली, व आवेशाच्या भरांत केस ओरबाडीत झोंपडीकडे जाऊं लागली. जातां जातां पुन्हां जरा थबकून मागें वळून पहात ती म्हणाली, " धनी, यापुढें लक्षांत ठेवा, ही जाई त्या फकिराला मेली आणि फकिरा जाईला मेला. गांधींचें रक्त प्यायला उठलेला अन् पोटासाठीं माणुसकी सोडून मुसलमान होणारा हैवान तो. तो मला मेला आणि मी त्याला मेलें. आतां माझ्या मर्जीला वाटलें तर दुसऱ्या कुणाशींही मी घरठाव करीन, पण हें बोलायचें नाहीं कुणापाशीं ! माझ्या बाबापाशीं बोलायचें नाहीं, मावशीपाशीं बोलायचें नाहीं, अगदीं कुणापाशीं बोलायचें नाहीं. "

जहांगीरशेट जाईचा तापट स्वभाव ओळखून होते. त्यांना फकिराचें पूर्वचरित्रही ऐकून माहीत झालें होतें. जाई बरीच पुढें गेली असें पाहून ते रावसाहेब जोशींना म्हणाले, “ जोशीसाहेब, पाहिलेंत हें! तुमच्या लक्षांत आली नसेल ही भानगड. समाजाच्या दृष्टीनें ह्या जाईचा नवरा फकिराच गुन्हेगार असेल, पण मी कांहीं त्याला गुन्हेगार म्हणणार नाहीं. आम्हीं त्याला गुन्हेगार बनवलाय. मीं ऐकलें आहे त्यावरून मला माहीत आहे, कीं तुम्हीं पुण्यांतल्या सनातनी लोकांनीं—” जोशीसाहेब एकदम कान टवकारून आपल्याकडे पाहूं लागले तें ध्यानीं घेऊन जहांगीरशेट अधिक जोरानें म्हणाले, “ होय, मी पुन्हां छातीठोकपणानें म्हणतों, कीं तुमच्या पुण्याच्या सनातनी लोकांनीं झाला तर परस्पर गांधींचा खून झाला आणि पकडला गेला—मेला तर एक म्हारडा मेला, घराच्या वळचणीचा एक उंदीर कमी झाला, अशा हिणकस वृत्तीनेंच गांधींवर बॉंब फेकावयाची कामगिरी त्या पोटार्थी गरीब पोराला सांगितली असेल. तो गुन्हा उजेडांत आलेला नाहीं. गुन्हेगार सांपडलेला नाहीं. अमकाच गुन्हेगार असें छातीठोकपणें मोकळ्या तोंडानें कुणाला बोलतां येणार नाहीं. परंतु सत्य तें सत्य. म्हणून जाईला मी मागें तें कानीं आलें तेव्हां त्याबद्दल दोष देऊं शकलों नाहीं. ”

रावसाहेब जोशी सनातनी पुण्याचा प्रश्न इतक्या खरमरीत भाषेंत जहांगीरशेटसारख्या त्रयस्थानें हाताळावा याबद्दल मनांतल्या मनांत जरा ओशाळले. पण त्यांची मनःस्थितीच नासलेल्या सांचपाण्यासारखी चमत्कारिक. त्यांना सनातन्यांना कुणीं नांवें ठेवलेलीं खपत नव्हतीं. पण सनातन्यांची बाजू शहाणेसुरतेपणानें पुढें मांडण्याइतकी सबळ व मुद्देसूद नाहीं हेंही ते ओळखून होते. त्यांनीं एकदम त्या विषयालाच बगल दिली आणि म्हटलें, “ बाकी सगळें फकिराचें बरोबर असेल, पण त्यानें मुसलमानी धर्म कवटाळावा ही गोष्ट मात्र मला अगदीं चमत्कारिक वाटते. मला सांगा जहांगीरशेट, माणसानें धर्मच सोडला म्हणजे बाकी काय राह्यलें त्याचें ? ”

“ धर्म ! धर्म ! ” जहांगीरशेट गालांतल्या गालांत हंसत म्हणाले, “ जोशीसाहेब, हा तुमचा सनातनी हिंदुधर्म कीं ज्या धर्मांत माणसां-

सारख्या माणसांना माणूस म्हणून जगतां येऊं नये. ख्रिस्ती मिशनरी येतात आणि अस्पृश्यांना बाटवून ख्रिस्ती करतात. रंजले गांजले किती तरी लोक वाड-वडिलांपासून आपल्या नांवाला चिकटलेला हिंदुधर्म झिडकारतात आणि जातिभेदाच्या छळापासून, वरच्या वर्गाच्या जाचापासून स्वतःची सोडवणूक करून घेण्यासाठीं ख्रिस्ती बनतात किंवा मुसलमान बनतात. अभिनिवेशाला बळी न पडतां खऱ्या अंतःकरणाला स्मरून सांगा, कीं फकिरा मुसलमान झाला यांत त्याचें काय चुकलें? माणुसकीचा दिलासा त्याला तुमच्या हिंदुधर्मापेक्षां मुसलमानी धर्मांत अधिक आढळला. ज्या धर्मांत माणसाला जगण्यापेक्षां मरणच सुखाचें वाटूं लागतें त्या धर्मावर लाथ मारून तो परधर्मांत गेला, तर तुम्ही आम्ही समजूतदार लोक त्याला चूक कोणच्या तोंडानें म्हणूं?"

"मग काय तुम्हीं जाईला आपला धर्म बुडवून त्या मुसलमानाची बायको व्हायला सांगितलें असतें?"

"सांगितलें असतें. जरूर सांगितलें असतें. माणुसकीचा धर्म माणसानें पाळावा म्हणजे झालें."

"पण तुमचे गांधीजी काय सांगतात?"

"गांधीजींचा देवधर्म 'सत्य' हा आहे."

"हिंदुधर्म उज्ज्वल करण्यासाठीं आणि हिंदुधर्माची इभ्रत वाढविण्यासाठीं अस्पृश्यांना हिंदुधर्मांत मानाचें स्थान मिळावें म्हणून गांधीजींनीं आपले प्राण पणाला लावले होते."

"होय आणि म्हणूनच पुण्याच्या हिंदुधर्माच्या अभिमान्यांनीं गांधींचा खून करण्याचा कट रचला होता. मी स्पष्ट बोलतों म्हणून मला माफ करा जोशीसाहेब, पण गांधीजींसारख्या थोर पुरुषाचा खून करण्यासारखे विषारी वैचारिक प्रवाह ज्या पुण्यांतून आणि ज्या महाराष्ट्रांतून वाहतात,— खरोखर मला जर पुणेंकर म्हणवून घेण्याचा प्रसंग आला असता तर अत्यंत दुःख झालें असतें."

जोशीसाहेब त्यावर कांहींएक बोलले नाहींत. कारण एक तर त्यांना माहीत होतें कीं जहांगीरशेट हा अगदीं गांधीवेडा मनुष्य आहे. बरें आपला एक धर्म, आपली एक संस्कृति, आपला एक देश, असल्या मोहक,

मादक उद्गारांनीं गुंगून जाण्याइतकी जातीय प्रतिगामिताही जहांगीर-शेठच्या ठिकाणीं नव्हती. खरें पाहतां ते अशा गांधीखुळ्या गृहस्थाच्या घरीं आपण होऊन आपल्या पायांनीं चालत यावयाचे नव्हेत, पण शकुंतला त्यांची सून आणि तिच्यापेक्षांही लहानगा अशोक—त्यांचा नातू यांच्या ओढीनें त्यांना डहाणूला ह्या गृहस्थाकडे यावें लागलें होतें.

"बरें तर जहांगीरशेठ, मी आतां तुमच्या बंगल्यावर जातों. आमची सूनबाई तिथें आली असेल नाहीं?"

"थांबा जरा, चौकशी करूंया. शकुंतलाबेन आतां बंगल्यांत राहाणारी सुखवस्तु पांढरपेशी स्त्री उरलेली नाहीं. त्या आल्या असल्या तर इथें, या जाईच्या झोपडींतच आल्या असतील."

एवढें संभाषण होईपावेतों ते दोघेही झोंपडीपाशीं येऊन ठेपले होते. उत्सवाची सारी तयारी झाली होती.

जहांगीरशेटनीं जाईला हांक मारली, "जाई—"

"जीऽऽ!" जाई झोंपडींतून 'ओ' देत लहानग्या अशोकाला कटिखांद्यावर खेळवत बाहेर आली.

"शकुंतलाबेन आंत आहेत?" जहांगीरशेटनीं विचारलें.

"बाई तुमच्या बंगल्यावरच गेल्या आहेत धनी!" जाई अशोकचे कुरळे केस हलक्या हातानें कुरवाळीत म्हणाली.

## २

जोशी साहेबांना तो साराच देखावा मोठा चमत्कारिक वाटला. एका संस्थानचा दिवाण, एका काळचा मुंबई सरकारचा दिवाण आणि कुबेर संपदा ज्याच्या घरीं दुथडीनें पाणी भरीत आहे असा धनवान, जसा बाप थोर तसा मुलगाही थोर; आणि त्या मुलाचा मुलगा जो संपत्तींत लोळत हंसतखेळत लहानाचा मोठा व्हायचा, त्या अर्भकाच्या कपाळीं असल्या अठराविस्वे दारिद्र्यांत भिकाऱ्या—टाकाऱ्याच्या पोराप्रमाणें वाढण्याची पाळी यावी!—अगदीं शिसारी आली जोशीसाहेबांना त्या दृश्याची. क्षणभर

त्यांना वाटलें, कीं आपण ओळखच देऊं नये या मुलाचे आजोबा आपण अशी.

पण तेवढ्यांत जहांगीरशेटनीं जाईला विचारलें, "कुणाचा ग हा बाळ आणलास जाई?"

"आणला बाळ श्रीमंताचा आणि झाला बाळ गरिबांचा." जाई अशोकाचे मटामट मुके घेत लीलेनें जोशीसाहेबांकडे पहात म्हणाली, "आई वनवासी, तसें आईचें बाळ वनवासी!"

"आपली भारतमाता वनवासी, तशीं तिचीं बाळें वनवासी!" जहांगीरशेट त्या बालकाच्या मळक्या कपड्याची जरा देखील खंत न करतां त्याला उचलून घेऊन कटिखांद्यावर खेळवीत म्हणाले, "फार थोर नशिबाचे आहां तुम्ही बाळ, म्हणून शकुंतलाबेनसारख्या मूर्तिमंत भारतमातेच्या पोटीं जन्माला आलां. भारतमातेच्या उद्धाराची सारी जबाबदारी तुम्हां उद्यांच्या पिढीवर आहे. आमच्या आणि आमच्या पूर्वींच्या जुन्या पिढ्यांनीं जीं पापें केलीं त्या पापांचें प्रायश्चित्त घेऊन जुन्या पिढ्यांना मुक्ति देण्याची थोर जबाबदारी तुमच्या शिरावर आहे."

बाळाच्या मळकट, घामट बाळचर्येचा कंटाळा न करतां जहांगीरशेटनीं त्या बाळाच्या बाळगालाचा पापा घेतला. तें पाहून जोशीसाहेबांना मनांतून अगदीं शिसारी आली. पण तिथें झोंपडीच्या अंगणांत जे वाडीवरचे चाळीस पन्नास शेतकरी जमले होते त्यांच्या दमल्या भागलेल्या पण उत्साहानें टवटवलेल्या चर्यांवर असीम सात्त्विक हास्याच्या लहरी झळकूं लागल्या.

जहांगीरशेटच्या मनांत एकदां आलें, कीं ह्या बालकाच्या आजोबांना वडीलपणाच्या थोरवीनें बालकाच्या मस्तकाचें अवघ्राण करूं द्यावें. पण त्यांनीं आपल्या मनांतील ऊर्मींना संयमाचा बांध घातला. मनांतून ते ओळखून चुकले, कीं ह्या बालकाची कष्टाळू गरिबींतील झालेली वाढ आजोबा आणि नातू यांचें मीलन होण्याच्या आड येत आहे.

तेवढ्यांत बागेंतून शकुंतला माघारी आली.

"जयंत जोशी तुम्हांला भेटले शकुंतलाबेन?" जहांगीरशेटनीं वत्सलतापूर्वक नजरेनें शकुंतलाकडे पाहात विचारलें.

"भेटले." गंभीरवृत्तीनें शकुंतला उत्तरली.

"जयंत आला होता?" जोशीसाहेबांनीं शकुंतलाला विचारलें.

"होय." शकुंतला घोगऱ्या सुरांत उद्गारली.

"आणि तरी देखील तूं इथेंच?"

"होय."

"तें काय म्हणून?"

सासऱ्याच्या त्या प्रश्नावर शकुंतला कांहीं उत्तरली नाहीं. ती मुकाटपणें जाईच्या हातून बाळाला घेऊन झोंपडीकडे गेली.

"शकुंतला, मला तुझ्याशीं थोडें बोलायचें आहे." जोशीसाहेब उद्गारले.

"बोलायचें तें सारें जयंत आणि मीं बोलून सारलें आहे. मला वाटतें आतां आपल्यांत बोलण्यासारखें कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं." असें उत्तरत शकुंतला झोंपडींत गेली.

"तरी पण मला तुझ्याशीं बोलायचें आहे." जोशीसाहेब पुन्हां झोंपडीकडे डोकावून पहात कांहींशा वडीलकीच्या अधिकारवाणीनें म्हणाले, "तूं जरा जहांगीरशेटच्या बंगल्याकडे येशील?"

यावर शकुंतला कांहीं उत्तरली नाहीं.

## ४

जहांगीरशेटच्या शेतवाडीवर आज शेतकऱ्यांच्या दृष्टीनें मूर्तिमंत आनंदी-आनंदाचें साम्राज्य पसरलें होतें. आजच्या अत्यंत गंभीर दिवशीं जहांगीर-शेटनीं दोन अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी जाहीर केल्या होत्या.

पहिली गोष्ट आपण कोंडीची पुण्यतिथि इतक्या निष्ठेनें कां साजरी करतों ही आणि दुसरी गोष्ट म्हणजे आजच्या मुहूर्तावर त्यांनीं आपण सबंध जहांगीर इस्टेटीचे केवळ विश्वस्त असून ही इस्टेट ह्या वाडींत काम करणाऱ्या आणि निढळाचा घाम गाळून धनधान्यसंपदा पिकविणाऱ्या शेतकरी जनतेची आहे, हें जाहीर केलें. ते नुसते आपली विश्वस्त निधीची

योजना जाहीर करूनच थांबले नाहींत; तर त्यांनीं स्वतःच्या वैयक्तिक कौटुंबिक खर्चालाही तीव्र मर्यादा घालून घेतल्या.

त्या प्रसंगाच्या निमित्तानें त्यांनीं स्पष्टपणें आपलीं मतें शेतवाड्यांचे धनी विश्वस्त व त्यांच्या वाडीवरील कष्टाळू शेतकरी यांच्या परस्पर संबंधाची जिव्हाळ्यानें जी पोटउकल केली, ती ऐकून शेतवाडीवरील सर्व शेतकऱ्यांना तर परमावधीचा आनंद झालाच, पण त्यापेक्षांही आनंद लालजीला झाला.

आणि लालजीनें शेख मिराकडे पाहिलें, तों त्याची मुद्राही लालजीला प्रसन्नतेनें फुललेली दिसली.

शेख मिरानें त्या समारंभांत जाहीरपणें बोलून दाखविलेंही, कीं जहां-गीरशेटसारखे जर भारतांतील सारेच जमीनदार व पुंजीपती गांधींचें नुसतें नांव न सांगतां गांधींच्या शिकवणीबरहुकूम प्रामाणिकपणें आचरण करतील, तर साऱ्या जगांतील जनतेचा उद्धार करण्याचें श्रेय गांधीजींना व गांधी-वादाला मिळेल.

शेख मिराच्या या वाक्याला मनापासून टाळ्या देणाऱ्यांत लालजी पहिला होता. टाळ्यांचा गजर व सर्वांमुखीं गरजणारा गांधीजींचा जयजयकार चांगला पांच मिनिटेंपावेतों वातावरणांत दुमदुमत होता.

परंतु तो गजर थांबतो न थांबतो, तोंच शेख मिरा पुढें उद्गारला, "पण असे उद्गार काढतांना मी गांधीवादापुढें कम्युनिझमचा पराभव झाला, असें मान्य करतों असें कुणींही मानण्याचें कारण नाहीं. शास्त्रवचन सांगतें, कीं अपवादानेंच नियमाची सिद्धता होते. श्रीमान् जहांगीरशेटनीं—"

मध्येंच जहांगीरशेट बैठकीवरून उठून सर्व लोकांना दोन्ही हात जोडून उद्गारले, "आतां मी श्रीमान् नाहीं. श्रीमंत आणि गरीब हा भेद आतां जहांगीरवाडींत उरलेला नाहीं. आतां आपण सारेच श्रीमान् अथवा सारेच गरीब, सारे सारखे. धनी आणि नोकर अशा दोन जाती यापुढें जहांगीरवाडींत दिसणार नाहींत. आपण सारे एकाच जातीचे प्राणी आहोंत. एकाच भारतमातेचीं लेकरें आहोंत. आपण सारीं माणसेंच आहोंत."

"मी माझे शब्द आनंदानें परत घेतों, आणि आमच्या जहांगीर-

शेटना असें नम्रतापूर्वक सुचवितों कीं त्यांनीं आपल्या आर्थिक श्रीमंतीवर पाणी सोडून हृदयाची श्रीमंती जी प्रकट केली आहे, ती तर त्यांना कधीं टाकतां येणार नाहीं ना? असे हृदयाचे श्रीमंत जगाच्या पाठीवर पुंजी-पतींत केवळ अपवादादाखल फारच विरळा निपजतात. आम्ही त्यांना कम्युनिस्ट म्हणतों—"

"आम्ही त्यांना गांधीवादी म्हणतों." लालजी दुप्पट उत्साहानें उद्गारला.

"गांधीवाद जर खरोखरच इतक्या सोज्ज्वळ स्वरूपाचा असेल, तर गांधीवाद हा शुद्ध स्वरूपाचा कम्युनिझम आहे, असें माझ्यासारखे गांधी-वादाचे कट्टर विरोधकही कबूल करतील. परंतु माझा गांधीवादावर तित-कासा विश्वास नसला तर स्वतःला गांधीवादी म्हणविणाऱ्या तथाकथित गांधीवाद्यांवर माझा पूर्ण विश्वास आहे. तो अशासाठीं, कीं गांधीवादाचा मतलबापुरता उपयोग करून घेऊन गांधीवादाच्या नांवावर कॉंग्रेसचा काळा बाजार करणाऱ्या थोर लोकांची परंपरा जी गांधीवादाच्या जन्मापासून आजपावेतों अखंड चालत आली आहे, त्या परंपरेला ते कधीं खंड पडूं देणार नाहींत. गांधीवादाचीं महान् तत्त्वें ते आपल्या हातानें ठार मार-तील वेळ आली तर. कोणत्या ना कोणत्या छद्मी रूपानें वेळीं गांधीजींनाही ठार मारतील—आणि?—आणि?—"

सारे लोक चित्रासारखे तटस्थ होऊन शेख मिराच्या गंभीर मुद्रेकडे पाहात होते. त्यावेळीं त्या सभास्थानीं टांचणी पडली असती तरी तिचा आवाज ऐकूं आला असता, इतकी सारी सभा अगदीं शांत निःस्तब्ध होती.

"आणि हे लोक गांधीवादाचा पराभव करून गांधीवादाशीं मानभावी-पणानें, फसवेगिरीनें हंसत खेळत लढतां लढतां मरून पडतील व आपल्या छाताडावरून विजय–भेरी वाजवीत चालून यायला कम्युनिझमला राजमार्ग मोकळा करून देतील."

शेख मिराच्या उद्गारानें तेथील एकंदर वातावरण जरी गंभीर झालें तरी निरुत्साही झालें नाहीं. कारण त्यांत तत्त्वतः गांधीवादाचा गौरवच होता.

जहांगीरशेटनीं समारोपादाखल चार शब्द बोलतांना विशद करून सांगितलें, "आतां माझे मित्र कामगार पुढारी शेख मिरा जें बोलले तें

सत्य आहे. तें कटु असलें तरी सत्य आहे. त्या कटु सत्यापासून खरोखरच आम्हीं गांधीवाद्यांनीं फार महत्त्वाचा धडा शिकण्यासारखा आहे. ही गोष्ट खरी आहे कीं गांधीजींनीं जरी आम्हा पुंजीपतींना विश्वस्त म्हणून आमचें कर्तव्य पार पाडण्याला आजवर कानींकपाळीं टाहो फोडून सांगितलें असलें, तरी गांधीवादाच्या सर्वमंगलतेची ती परिसीमा मुळींच नव्हे. आम्ही पुंजीपतींनीं विश्वस्त या नात्यानें आमचें कर्तव्य बजावण्याचें टाळलें तरी आमची टाळाटाळ काळाला मंजूर होणार नाहीं. जर गांधीवादी अहिंसा-धर्मानें हा प्रश्न पुंजीपती गांधीजींच्या विश्वस्ताच्या नात्यानें पार पाडणें टाळतील तर आपले कामगार पुढारी म्हणाले त्याप्रमाणें कम्युनिझमच्या जगबुडींत जगांतील सारे पुंजीपती आज ना उद्यां त्यांच्या पुंजीवादासह नामशेष होतील. गांधीवादाच्या नांवावर विकणाऱ्या आम्हीं पुंजीपतींनीं गांधीवादाचा हा अलिखित दंडक विसरून चालणार नाहीं."

सभा संपली. रावसाहेब जोशी जरी सभा संपेपावेतों सभास्थानीं बसले होते, तरी त्यांना एकंदरींत सभेचा अगदीं उबग आला होता. सभेच्या ठायीं ते जहांगीरशेटशीं कांहीं बोलले नाहींत. पण कोंडाबाईच्या जयजय-कारांत त्या पुण्यतिथीच्या उत्सवाचा समारोप झाल्यावर जहांगीरशेटजीं-बरोबर त्यांच्या बंगल्यावर जातां जातां ते म्हणाले, "बोटवालासाहेब, तुम्ही तर नखशिखांत पालटलेले दिसतां! तुमचा कायापालट झाल्यासारखाच आहे हा!"

जोशीसाहेब छद्मी शिष्टपणानें बोलले हें जहांगीरशेटनीं ओळखलें. पण नेहमीं दूधपाण्याच्या सरमिसळींतून कलहंसाप्रमाणें दूध तेवढें शोषून घेऊन पाणी टाकून देण्याची कला त्यांनीं आत्मसात् केली होती. ते ऐकलें न ऐकलेंसें करून म्हणाले, "जोशीसाहेब, सोनें खाणींत सांपडतें. आपले हे कोटमाप दरिद्री नारायण ही खरोखर सोन्याची खाण आहे."

"मला तर तुमची आजची कोंडी–प्रशस्ति ऐकून नवल वाटलें कीं तुम्ही नुसते श्रीमान् झालांत, नुसते मुंबई सरकारचे कॉंग्रेस दिवाण झालां; पण फिर्दोसीसारखे महाकवि कसे झालां नाहींत! शून्यांतून काव्यलाघवाचें ब्रह्मांड निर्माण करण्याची कला शब्दसृष्टीचे ईश्वर जे कवि त्यांना साधलेली असते. एका यःकश्चित् झाडूवालीच्या मामुली जीवनांत एवढी उदात्तता

हुडकून काढणें हें आमच्यासारख्या सामान्य माणसाचें काम नव्हे."

जोशीसाहेबांचे ते सहेतुक उपेक्षावृत्तीचे बोल जहांगीरशेटजींच्या मनाला जखम करून गेले. ते मनांत म्हणाले, 'समाजाच्या दृष्टीनें कोंडी यःकश्चित् स्त्री असेल, पण माझ्यासारख्या व्यसनाधीन पुंजीपतीला स्वतःच्या ठायींच्या निरागस चांगुलपणानें जनावरांतून माणसांत आणून सोडणारी प्रभावी शक्ति ती होती."

आणि खरोखरच जहांगीरशेटजींच्या जीवनाच्या दृष्टीनें कोंडी ही एक प्रभावी व्यक्ति ठरली होती. त्या शेतवाडीवरील शेतकऱ्यांना तें माहीत नव्हतें. सोमनाथ हा कोंडीचा पति, धोंडी तिची बहीण आणि जाई तिची लेक; या साऱ्यांची कल्पना आजपावेतों अशी होती, कीं शेटजींनीं कोंडीला नादीं लावलें. पण नादीं लावून फसवलें नाहीं. अगदीं लग्नाच्या बायको-इतका आदर त्यांनीं तिच्याविषयीं आरंभापासून अखेरपावेतों मनांत जोपासला होता.

पण स्वतः जहांगीरशेटजींनीं आज तें उज्ज्वल सत्य प्रथमच प्रकाशांत आणलें. त्यांनींच आपल्या तोंडानें कबूल केलें, कीं ऐन विशीच्या भर उमेदींत देखील कोंडी आपणापुढें कसल्याही मोहाला बळी पडली नाहीं. ती रूपवती होती. पण तिनें आपल्या रूपलावण्याचा बाजार मांडला नाहीं. जहांगीरशेटजींचा तिच्या ठायीं रूपलावण्याबद्दल व यौवनाबद्दल ओढा होता; पण ते तिच्या रूपलावण्याची आणि यौवनाची अनीतिकारक माती करायला टपले असले तरी तिनें त्यांचें सोनें करून दाखविलें. आपल्या आणि आपल्या कुटुंबाच्या पोटासाठीं ती जहांगीरशेटजींची सेवेकरीण बनली खरी, पण सेवाधर्म पाळतांना तिनें आपल्या कष्टाचें मोल दिलें. आपल्या चारित्र्याचें मोल दिलें नाहीं. उलट तिनें जहांगीरशेटजींवर आपला आदरयुक्त सद्गुणी वचक ठेवून त्यांना सन्मार्गी बनवलें.

सोमनाथाला हें आज जेव्हां कळलें, तेव्हां भरसभेंत त्याच्या नेत्रांवाटे कृतज्ञतापूर्ण आनंदाच्या पवित्र गंगा-यमुना वहात होत्या. अशा थोर आईच्या उदरीं आपण जन्माला आलों, म्हणून जाईला अभिमान वाटत होता व अशी थोर बहीण आपणाला लाभून गेली, म्हणून धोंडी धन्यता मानीत होती.

## ५

सभा संपल्यावर एकट्या रावसाहेब जोशांखेरीज बाकी सारे गांवकरी, सुशिक्षित व शेतकरी स्त्रीपुरुष, मुलें-बाळें दरोबस्त सार्‍यांचें मस्तक त्या झाडूवालीच्या वृंदावनरूपी स्मारकावर नमलें व एकटे रावसाहेब जोशी मात्र तिथें मस्तक नमवण्यांत कमीपणा मानून अंगचोरासारखे बाजूला राहिले होते.

रावसाहेब जोशांची तेथील उपस्थिति म्हणजे केवळ ताकापुरतें रामायण होतें. सभा संपल्यावर देखील बराच वेळपावेतों जहांगीरशेटजींच्या बंगल्यावर ते थांबले होते, ते शकुंतला आतां येईल मग येईल ह्या आशेवर.

पण शकुंतला आली नाहीं.

रावसाहेब जोशांनीं शेतांत झोंपडीवर गडी पाठवून चौकशी केली, तेव्हां ती मुंबईला निघून गेल्याचें त्यांना कळलें. म्हणून ते तसेच शेटजींचा निरोप घेऊन मुंबईच्या वाटेला लागले. येथवरच्या एकंदर प्रकाराबद्दल ते फारच असंतुष्ट झाले होते. तेवढा पोरगा हातीं लागला तर घ्यावा आणि सुनेला पाहिजे तिकडे देशभक्तीची भीक मागत सोडून द्यावें असें त्यांच्या मनानें घेतलें होते.

पण विधिघटनेनें त्यांच्यापुढें व सर्व संबंधियांच्यापुढें निराळेंच ताट वाढून ठेवलें होतें.

## ६

इस्पितळांतील डॉक्टरांना त्या दिवशीं तो एक नवीनच देखावा पहायला मिळाला. तसें पाहूं जातां, सोपाना वाघमारे हा एक कंगाल फाटका कामगार. तो त्या दिवशीं मोटारीखालीं अपघातांत सांपडला तसे आणखी अनेक गोरगरीब अपघातांत सांपडतात. त्या गरिबांच्या इस्पितळांत असे अपघाती रोगी वारंवार आलेले सर्व डॉक्टरांनीं पाहिले होते. पण ह्या एका कंगाल भिकारी माणसाला रस्त्यावरून इस्पितळांत आणून पोंचवितांना पुढाकार घेणारी एक सुशिक्षित पांढरपेशी महिला होती.

ती शकुंतला जोशी होती, अशी ओळख इस्पितळांत पटायला वेळ लागला नाहीं. कारण कांहीं वर्षांपूर्वी शकुंतला ही कॉलेजांत शिकणारी मुलगी होती, त्यावेळचे तिचे सहाध्यायी व सहाध्यायिनी इस्पितळांत कोणी डॉक्टर होते तर कोणी नर्सेस होत्या. शकुंतला ही थोरामोठ्याची बायको आणि थोरामोठ्याची सून म्हणून सर्वजण तिला ओळखीत होते. माणसाचे कपडे बदलले, रहाणी बदलली म्हणजे रूप आणि स्वभावगुण थोडेच बदलतात?

बहुतेक सर्वांनीं तिला ओळखलें.

ही इकडे कशी?

ज्याच्या त्याच्यापुढें तोच एक कुतूहलाचा प्रश्न उभा होता. मुंबईच्या वर्तमानपत्रांनीं सोपानाच्या अपघाताची व त्याला इस्पितळांत नेऊन पोंचविणाऱ्या शकुंतला जोशींची हकीकत आपल्या वृत्तपत्रांतून विस्तृतपणें व ठळकपणें छापली होती. त्यामुळें आज दोन दिवस एवढ्या मोठ्या मुंबई शहरांत तो एक चांगलाच चर्चेचा विषय होऊन बसला होता.

त्याचें असें झालें. डहाणूहून शकुंतला जोशी सोपानाला हुडकीत जी निघाली ती कालपावेतों पांच सहा दिवस सारखी परेल-पोयबावडीसारख्या कामगारांच्या वस्तींतून त्याला धुंडीत वणवण करीत होती. वेड्यासारखा तो इतके दिवस कुठें भटकत भरकटत होता कोण जाणे; त्या दोघांची कांहीं गांठ पडली नव्हती.

परंतु जीवनांतील हा एकच गुंतागुंतीचा प्रश्न शकुंतलाला निर्वाणीच्या स्वरूपांत सोडवायचा होता असें नाहीं. अर्थात् हा प्रश्न तर महत्त्वाचा—तिच्या जीवनमरणाच्या मोलाचा होताच; पण वडापिंपळाच्या पाळेंपारंब्यां-प्रमाणें त्या प्रश्नाच्या विस्ताराच्या शाखाप्रशाखांनीं तिचें व तिच्याबरोबर आणखी अनेकांचें जीवन घेरलेलें होतें.

जिथें सोपाना तिथें आपण, आपणामुळें ज्याचें जीवन करपून गेलें आहे, त्याच्या जीवनांत नवचैतन्य ओतून त्याला नवी पालवी फुटेल असे प्रयत्न करणें हें आपलें अत्यंत महत्त्वाचें कर्तव्य आहे, हें ती वस्तुतः अनेक वर्षांपूर्वीपासून—किंबहुना लग्नापूर्वीपासून व लग्न झाल्यानंतरही—जाणून होती. पण ही अंतःकरणांत डांचणारी कर्तव्याची जाणीव कृतीनें

सार्थ करण्याला ती अनेक परींनीं असमर्थ होती. ती असमर्थता कांहीं योगायोगामुळें व कांहीं तिच्या प्रयत्नामुळें अरुणोदयाच्या कोंवळ्या किरणांनीं काळोख दूर व्हावा तशी दिवसेंदिवस दूर होत होती.

जीवनांतील तो अत्यंत अवघड पेंचप्रसंग एकदांचा निर्णयात्मक रीतीनें सोडवून घेण्यासाठीं ती सत्याग्रही स्त्री या नात्यानें छत्रपुरांतील आपला कार्यव्याप थोडे दिवस आवरता घेऊन मुंबईला आली होती.

ते तिच्या जीवनांतील बहुतेक गुंतागुंतीचे प्रश्न आतां सुटले होते. जयंत जोशी शकुंतलाचे पति खरे, पण स्वार्थी असले तरी सुजाण होते. दुसरें असें, कीं शकुंतलानें अत्यंत समंजसपणानें आपल्या अंतःकरणाचा त्यांच्या-पाशीं आविष्कार करतांना त्यांच्या आवडत्या दयाशीं लग्न करण्याचा मार्ग मोकळा करून दिला होता.

त्या दिवशीं शकुंतला दयाच्या खोलींत आपली दैनंदिनी विसरून गेली, त्याचें भान तिला डहाणूहून सोपानाचा शोध करीत ती आली तेव्हां आलें.

" तुम्ही मला क्षमा कराल शकुंतलाबाई, पण प्राप्त परिस्थितींत माझ्या-ऐवजीं दुसरी कोणीही स्त्री असती तरी ती सद्धेतुपूर्वक ती दैनंदिनी वाचण्याचा मोह आवरूं शकली नसती. तथापि तुमच्या परवानगीखेरीज तुमची खासगी दैनंदिनी तुमच्या अपरोक्ष वाचल्याबद्दल मीं तुमची क्षमा मागितलीच पाहिजे. आपण दोघीही आज अशा चमत्कारिक परिस्थितींत आहों, कीं ही चूक झाली, अशा चुका करणें हें मला भूषण आहे आणि अशा चुकांबद्दल मला क्षमा करणें हें तुम्हांला भूषण आहे."

शकुंतला डहाणूहून आल्यावर व जयंत जोशीची आणि दयाची भेट होऊन गेल्यावर ती दयाला भेटली तेव्हां दया उद्गारली.

शकुंतलाच त्या सर्व घटनांची कर्तीकरविती असल्यामुळें तिला त्यांत विशेष नवल वाटलें नाहीं. तिनें हंसत हंसत दयाला म्हटलें, " अशोकला तुम्हीं माझ्याकडे आणून सोडला, यांत तुमची झालेली चूक आतां तुमच्या ध्यानीं आलीच असेल. "

दया त्यावर कांहीं बोलली नाहीं.

" केल्या चुकीबद्दल शिक्षा माणसानें भोगलीच पाहिजे. यावेळीं मी तुमची न्यायाधीश आहें. माझ्या अशोकची दोन्ही नात्यांनीं आई

होण्याची शिक्षा मी तुम्हांला फर्मावीत आहें." ती हंसत हंसत पुढें म्हणाली, "न्यायाधीश हंसतमुखानें शिक्षा फर्मावीत आहे आणि आरोपीनेंही ती हंसतमुखानें मान्य केली पाहिजे. या खटल्यांत जयंत हेही एक आरोपी आहेत. त्यांचीदेखील अर्थातच या शिक्षेंतून सुटका झाली."

आणि नंतर त्या दोघी सवती सवती एकमेकींना कळवळ्यानें मिठी मारून भेटल्या, रडल्या, मुसमुसल्या. त्यांत दुःख किती होतें आणि आनंद किती होता, याचा शोध घ्यायला त्यांच्या त्याच असमर्थ होत्या.

रावसाहेब जोशी मात्र या एकंदर प्रकरणांत मूळपासूनच अत्यंत असंतुष्ट होते. पण केवळ शाब्दिक निषेध व्यक्त करण्यापलीकडे त्यांचे हातीं तरी काय होतें ! ते डहाणूहून मुद्दाम माघारीं येऊन शकुंतलाचा शोध घेण्यासाठीं व तिला उपदेशाचे दोन शब्द सांगण्यासाठीं खूप धडपडले. परंतु त्यांची आणि शकुंतलाची भेट झाली नाहीं. तिनें त्यांना मुद्दामच टाळलें होतें, समोरासमोर वडीलधाऱ्या माणसाची अवहेलना करण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून.

तथापि या प्रकरणांतील एकंदर गुंतागुंतीचा त्यांना अखेर चांगला उलगडा पडला होता. आणि पदरीं पडलें व पवित्र झालें असें म्हणत ते आपल्या होऊं घातलेल्या नव्या सुनेला आशीर्वाद देत छत्रपूरला निघून गेले होते. जातांना पुन्हां पुन्हां दयावर पडणाऱ्या अशोकाची आई या नात्याच्या जबाबदारीची जाणीव दयाला द्यायला मात्र ते विसरले नाहींत. शकुंतला तर आतां त्यांच्या दृष्टीनें मेल्यांतच जमा होती. त्यांनीं आपण होऊनच जयंत जोशींना धीर देऊन सांगितलें होतें, कीं असली नादान, उठवळ बायको आपल्या घराण्यांत नको. ती त्या भिकारड्या कामगाराचा हात धरून पाहिजे तिकडे भीक मागत आणि देशभक्ति करीत जाऊं दे.

त्या दिवशीं अपघाती रोगी सोपाना वाघमारे याच्या अंगांत नवें रक्त घातल्याखेरीज त्याची प्रकृति सुधारणार नाहीं, असें डॉक्टरांनीं सांगितलें मात्र, आणि रक्तदानासाठीं शकुंतला, शेख मिरा, लालजी आणि आपलें श्रीमंती जीवन सोडून स्वेच्छेनें गरीब कष्टाळू कामगार–जीवनांत प्रविष्ट झालेली चित्राबेन पारेख ही मंडळी इतर कामगारांच्या अगोदर पुढें आलेली पाहून डॉक्टरांनाही नवल वाटलें.

डॉक्टरांनाही वर्तमानपत्रांतून रसाळ वार्ता वाचून व दयाकडून अनेक गोष्टी ऐकून वस्तुस्थिति माहीत झाली होती. डॉक्टर देखील शकुंतला व चित्राबेन यांसारखे श्रमजीवींच्या जीवनाशीं समरस झालेले नसले, तरी श्रमजीवींविषयीं गाढ सहानुभूति बाळगणारे सुजाण होते.

एकेकाचें रक्त घेऊन तें सोपानाच्या रक्ताशीं जुळतें आहे कीं नाहीं याची परीक्षा करतां करतां डॉक्टर विनोदानें चित्राबेनकडे पाहून म्हणाले, "गृहमंत्री आणि उपगृहमंत्री अशांसारख्या थोरांतील थोरांच्या बायकांच्या रक्तावर हा कामगार जीवन धरणार आहे; जगणार आहे. याचा परिणाम काय होईल ?"

चित्राबेन व शकुंतला या दोघींनीं डॉक्टरांच्या हेतुगर्भ भाषणांतील विनोद ओळखला. शकुंतला कांहीं न बोलतां सुकलेल्या ओठांवर हंसू खेळूं लागलेल्या सोपानाकडे पाहून दुःखीकष्टी परिस्थितींतून नुसती हळुवार हंसली.

चित्राबेन मात्र लगेच रोखठोक बोलून गेली, "याचा परिणाम असा होणार आहे डॉक्टर, कीं हे कामगार उद्यां मंत्री होणार आहेत. त्यांचें राज्य होणार आहे. ते आपणांवर राज्य करणार आहेत."

डॉक्टरांनीं दोनतीन रक्तें तपासलीं. त्यांत शकुंतलाचें रक्त अगदीं पहिल्या प्रतीचें ठरलें, व रक्तदानाचा पहिला मान तिला मिळाला.

डॉक्टर चित्राबेन व इतर मंडळी यांच्याकडे पाहून स्मितहास्यपूर्वक म्हणाले, "कुणाचा योगायोगावर विश्वास असो वा नसो. पण याला म्हणतात योगायोग !"

—*—